# थेरीगाथा

अनुवादक :

प्रा. डॉ. शेषराव मेश्राम




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई



*डॉ. बाबासाहेब आंबेडकर*

*–ज्यांच्या प्रेरणेने मला आणि अनेकांना पालि भाषा आणि साहित्याच्या अभ्यासाची आवड निर्माण झाली–*
*यांना अर्पण.*

# अनुक्रमणिका

# निवेदन

प्राचीन तसेच अर्वाचीन भारतीय भाषांमधील अभिजात साहित्याचे मराठीत भाषांतर करून ते प्रकाशित करण्याचे कार्य महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने १९६० पासून हाती घेतलेले आहे. संस्कृत तसेच पालि भाषेतील काही महत्त्वाच्या ग्रंथांची सटीप भाषांतरे मंडळाने या आधी प्रकाशित केली आहेत. भाषांतरित ग्रंथांच्या त्या मालिकेतच "थेरीगाथा" या ग्रंथाचा समावेश करावयास हवा.

खुद्दक निकायाच्या पंधरा भागांपैकी नववा भाग म्हणजे "थेरीगाथा". अडीच हजार वर्षांपूर्वीच्या काळातील भारतीय स्त्रीच्या जीवनाचे दर्शन "थेरीगाथा" घडवते. त्यात ७३ भिक्खुणींचे उदान म्हणजे उद्‌गार पद्यरूपात आढळतात. आत्मशुद्धी, आत्मविजय आणि आत्मशांतीचा असाधारण अनुभव घेतलेल्या या सर्व भिक्खुणींनी आपल्या पूर्वायुष्याबद्दल माहिती दिलेलीच आहे असे नाही. त्यामुळे थेरीगाथेचे अनुवादक डॉ. शेषराव मेश्राम यांनी "अपदान" आणि "परमत्थदीपनी" या ग्रंथातून गोळा केलेल्या या भिक्खुणींच्या चरित्रविषयक माहितीची जोड दिली आहे.

महाकारुणिक भगवान बुद्धाच्या शिकवणीपासून प्रेरणा घेऊन या स्त्रियांनी भिक्खुणींच्या संघामध्ये प्रवेश केला. सांसरिक बंधने त्यांनी झुगारुन दिली. अशा स्त्रियांमध्ये भगवान बुद्धाची सापत्न माता महापजापती गोतमी, पत्नी यशोधरा यांच्याप्रमाणेच सर्व वर्णांच्या आणि जातींच्या स्त्रियांचा समावेश होता.

डॉ. शेषराव मेश्राम यांनी आरंभी प्रत्येक भिक्खुणीची ओळख करून देऊन मग मुळातील गाथेचे भाषांतर केलेले आहे. पुस्तकाच्या अखेरीस त्यांनी दिलेल्या टिपांमुळे अनेक संदर्भ स्पष्ट होतात.

वाचकांना हा ग्रंथ आवडेल असा विश्वास वाटतो.

**य. दि. फडके**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई
७ मार्च १९९४

अनुक्रमणिका

# ग्रंथ परिचय

आंतरराष्ट्रीय महिला वर्ष म्हणून १९७५ हे वर्ष जगभर साजरे करण्यात आले. त्या निमित्ताने संपूर्ण जगात चर्चा, परिषदा, परिसंवाद, साहित्य प्रकाशन, महिलांचे मेळावे आदी कार्यक्रम आयोजित करण्यात आले. इतकेच नव्हे तर जून महिन्यात मेक्सिको येथे आंतरराष्ट्रीय महिला वर्ष परिषद घेण्यात आली. आपल्या देशात सुद्धा त्या निमित्ताने वर्षभर अनेक कार्यक्रम आयोजित करण्यात आले.

या संदर्भात भारतीय स्त्रियांचा दर्जा प्राचीन काळी कसा होता हे पाहणे उचित ठरेल. प्राचीन काळात भारतीय स्त्रियांचा बौद्धिक आणि सामाजिक दर्जा फारच उच्च प्रतीचा होता असे दिसते. ज्या काळात जगातील इतर कोणत्याही देशात स्त्रियांना इतका मानसन्मान मिळत नव्हता त्या काळात भारतीय स्त्रियांना तो मानसन्मान मिळत होता. नंतरच्या काळात मात्र स्त्री ही माया, शूद्राप्रमाणे नीच आणि त्याज्य आहे असे समजले जाऊ लागले. समाजात त्यांना कोणतेही मानाचे स्थान राहिले नाही. त्या घरात लपवून ठेवल्या जाऊ लागल्या. संतती उत्पन्न करणे, त्यांचे पालन-पोषण करणे हेच त्यांचे कर्तव्य समजले जाऊ लागले. एवढेच नव्हे तर पुरुषांची वासना शांत करण्याचे त्या एक साधन आहेत असे मानले गेले.

स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या तीन तत्त्वावर आधारलेल्या सामाजिक उत्थानाच्या विचाराने महाकारुणिक भगवान बुद्धाच्या काळात त्यांची हीन अवस्था संपायला सुरुवात झाली. त्यांना पुरुषासारखा समान व मानाचा दर्जा प्राप्त होऊ लागला. मानव-समाजाच्या उत्थानात त्यांचा सहभाग अत्यंत मोलाचा आहे असा विचार पुढे आला. भगवान बुद्धाने स्त्रियांच्या संबंधात मांडलेले विचार 'त्रिपिटक' ग्रंथात ठिकठिकाणी आढळतात. या विचारावरून हे स्पष्ट होते की त्यांना स्त्रियांबद्दल अतीव आदर होता. म्हणूनच त्यांनी स्त्रियांचा वेळोवेळी गौरव केलेला दिसून येतो.

मंगलसुत्त आणि सिगालसुत्त यात गृहस्थांनी गृहिणींचा आदर करावा असा उपदेश आहे. अनाथपिंडिकासारख्या गृहस्थांनी आपल्या गुणांनी उपासक वर्गात जसे अग्रस्थान प्राप्त केले होते, तसेच विशाखासारख्या गृहिणींनी उपासिका वर्गात प्राप्त केले होते. नकुलमाता नावाच्या उपासिकेने आपल्या पतीला उपदेश केला आहे. तिचा उपदेश वाचल्यास तिला उपासिका वर्गात अग्रस्थान प्राप्त का झाले याची कल्पना येते.

बौद्ध धम्मात पुरुष आणि स्त्री या दोघांनाही समानतेचे स्थान देण्यात आले आहे. दोघेही आपल्या कर्मानुसार उच्च अथवा नीच होऊ शकतात. आपल्या कर्माने सद्‌गती अथवा दुर्गती प्राप्त करू शकतात. भगवान बुद्धाने पुरुषांप्रमाणेच स्त्रियांना सुद्धा बुद्धिस्वातंत्र्याचा उपदेश केला. पुरुषांना सांगितले की, तुम्हीसुद्धा महिलांची सेवा करा, त्यांच्याकडूनच सेवेची अपेक्षा करू नका. सिगालोवादसुत्तात पती-पत्नींची कर्तव्ये सांगतांना म्हटले— 'पतीने आपल्या पत्नीची पाच प्रकारे सेवा केली पाहिजे : (१) त्याने आपल्या पत्नीचा सन्मान केला पाहिजे. (२) तिचा अपमान करू नये. (३) परस्त्रीगमन करू नये. (४) तिला धनसंपत्ती देऊन गृहस्वामिनी करावे. (५) दागदागिने, वस्त्र इच्छेनुसार देऊन संतुष्ट ठेवावे.'

भगवान बुद्धाच्या धम्मात स्त्री आणि पुरुषांना समानतेचा दर्जा देण्यात आला होता हे खालील प्रसंगावरून सुद्धा स्पष्ट होणारे आहे. एके वेळी भगवान बुद्ध श्रावस्तीमधील जेतवन विहारात राहत होते.

कोशल नरेश प्रसेनजित भगवंतांच्या जवळ बसून उपदेश ऐकत होता. त्याचवेळी ‘मल्लिका राणीने एका कन्येला जन्म दिला’ ही सुवार्ता एका दूताने राजाला कळविली. ही वार्ता ऐकून राजाचा चेहरा उदास झाला. राजाच्या चेहऱ्यावरची उदासीनता पाहून तथागताने म्हटले– ‘महाराज, काही काही स्त्रिया पुरुषापेक्षाही श्रेष्ठ, बुद्धिमान, शीलसम्पन्न, सासू-सासऱ्यांची सेवा करणाऱ्या व पतिव्रता असतात. त्यामुळे कन्येचे चांगले पालन-पोषण कर. सर्व दिशा जिंकणारा महाशूर वीर पुत्र तिच्याचपासून जन्म घेतो. तशा चांगल्या स्त्रीचा पुत्र राज्याचे अनुशासन करतो.’

स्त्री-स्वातंत्र्याचा उद्‌घोष करून बुद्धाने समस्त स्त्री वर्गाला सांगितले, ‘महिलांनो! तुम्हाला सुद्धा पुरुषासारखा अधिकार आहे. तुम्ही सुद्धा संयम ठेवून व मातृत्वाच्या पुढे जाऊन परमज्ञान प्राप्त करू शकता. तुम्ही गृहस्वामिनीच नव्हे तर विश्व पूजनीय स्थान प्राप्त करू शकता. राग, द्वेष, मोह आदी विकारांचा नाश करून तुम्ही सुद्धा संसारातील दुःखापासून मुक्त होऊ शकता.’

त्यांच्या समतेच्या संदेशाने प्रेरित होऊन अनेक महिला सांसारिक बंधनातून मुक्त झाल्या. पती, पुत्र, धन, संपत्ती, ऐश्वर्य आदी सांसारिक उपभोगांचा त्याग करून निब्बाणगामी मार्गाने जीवनाची वाटचाल करू लागल्या. स्त्रियांना भिक्खुणी संघात प्रवेश देऊन भगवान बुद्धाने महान कार्य केले. त्यांच्या या महान कार्यात त्यांची मावशी महापजापती गोतमी, त्यांची पूर्व पत्नी यशोधरा इत्यादी शेकडो महिलांनी सहभागी होऊन स्वतःचे आणि इतर अनेकांचे कल्याण केले. समस्त महिला वर्गावर तथागताची ही महान करुणा होती.

प्रस्तुत ‘थेरीगाथा’ हा ग्रंथ खुद्दक निकायात मोडतो. खुद्दक निकायाचे पंधरा भाग आहेत. त्यात थेरीगाथा ग्रंथाचा क्रमांक नववा आहे. या ग्रंथात बुद्धकालीन भिक्खुणींचे पद्यबद्ध जीवन-संस्मरण संग्रहीत करण्यात आले आहे. या ग्रंथात परमोच्चपद प्राप्त केलेल्या ७३ भिक्खुणींचे उदान अर्थात उद्‌गार आहेत. विमुक्ती सुखाच्या परमोच्च आनंदाने त्यांच्या तोंडून सहज निघालेल्या त्या पद्यबद्ध गाथा आहेत. साधनेच्या उच्चतम शिखरावर चढलेल्या त्या महान साधिकांचे जयघोष यात समाविष्ट करण्यात आले आहेत. आर्य मार्गाने निब्बाणाकडे वाटचाल करणाऱ्या यात्रिकांचे जयघोष यात आहेत. संसाराचे सम्यक् ज्ञान प्राप्त करून जन्ममृत्यूवर विजय मिळविलेल्या वीर महिलांचे हे विजयगीत आहे.

या ग्रंथात एकूण ५२२ गाथा असून त्या सोळा निपातात विभागल्या आहेत. या गाथांमध्ये आत्मशुद्धी, आत्मविजय आणि आत्मशांतीचा हर्षध्वनी निनादतो. अधिकाश गाथांमध्ये निब्बाणाचे संकेत मिळतात. नैतिकतेवर आधारलेले सत्य, हृदयाला सरळ सरळ भिडणाऱ्या गंभीर भावना, सर्वांत महत्त्वाचे म्हणजे स्वानुभव हे या गाथांचे वैशिष्ट्य आहे. जीवनातील अपरिमित दुःख, दारिद्र्य, विषमता व अनेक प्रकारच्या यातनांवर मिळविलेल्या विजयाचा हा मंगल ध्वनी आहे. ‘अहो! मी किती सुखी आहे’ अशा प्रकारचे उद्‌गार त्यांच्या तोंडून सहज बाहेर पडतात. ‘निब्बाणाच्या परमशांतीचा मी साक्षात्कार केला आहे’ या साक्षात्काराद्वारे जीवनातील निराशावादाचे निराकरण करण्याचा संदेश देण्यात आला आहे. बुद्ध, धम्म आणि संघाला शरण गेल्यावर प्राप्त झालेल्या नवजीवनाची प्रेरणा या भिक्खुणी देतात.

प्रायः सर्व भिक्खुणींच्या उद्‌गारात साहित्यिक गुण प्रकर्षाने आढळतात. त्यामुळे या ग्रंथाला पालि साहित्यातील एक अमोल ठेवा म्हटले जाते. सुभा थेरीच्या गाथामध्ये वसंत ऋतूचे वर्णन आहे. ते अत्यंत सूक्ष्म निरीक्षणावर आधारलेले आहे. फक्त पार्श्वभूमी हा त्याचा उद्देश आहे. ही भिक्खुणी आपला डोळा ‘अश्रुजल सिंचित पाण्याचा बुडबुडा’ आहे असे म्हणते.

अनुक्रमणिका

भिक्खुणींच्या आंतरिक अनुभवाच्या जोडीला पूर्वायुष्यातील जीवनाचे वर्णन अधिक सापडते. बऱ्याच थेरींनी आपल्या पारिवारिक व सामाजिक अवस्थांचे कथन केले आहे. आपल्या पूर्वायुष्यातील सुख, दुःख, कटु, गोड आदी अनुभव सांगितले आहेत.

मुत्ता, गुत्ता, सुभा या भिक्खुणींनी सांसारिक जीवनातील घटनांचे वर्णन केले आहे. उब्बिरी, किसा गोतमी व वासेट्ठी यांच्या गाथांमध्ये पुत्र वियोगाचे कथन आहे. सुन्दरी नन्दा व चन्दा यांनी पतीच्या मृत्यूमुळे प्रब्बज्ञा घेतली. पटाचारा थेरीचे संपूर्ण पूर्वजीवन करुणेने भरलेले दिसते. सर्वच थेरींनी अशुभ गोष्टींची भावना केली आहे. कोणी म्हणते 'माझी भव-तृष्णा नष्ट झाली ', कोणी म्हणते 'माझे आवागमन (जन्म घेणे व मरणे) संपले', 'माझ्या हृदयात रुतलेला बाण निघाला ', कोणी म्हणते 'मी चित्तमलरहित झाले आहे', तर कोणी सांगतात 'मी सर्वथा शांत व निष्पाप आहे'.

थेरींचे उद्‌गार अत्यंत गंभीर असल्यामुळे त्यांचा मानवी हृदयावर प्रभाव पडल्याशिवाय राहात नाही. मानवी मनाला प्रेरणा देऊन त्याला पवित्रतेच्या उच्च शिखरावर नेऊन सोडतात. 'जे करून पश्चात्ताप करावा लागत नाही त्या बुद्धशासनाचे आचरण करा. ताबडतोब पाय धुवून एका बाजूला बसा.' पटाचारा थेरीचा हा उपदेश किती प्रेरणादायक आहे. प्रत्येक थेरीला निब्बाणप्राप्तीचा आत्मविश्वास वाटत होता. स्त्रिया अबला आहेत असे सांगितल्यावर सोमा थेरी मोठ्या आत्मविश्वासाने म्हणते, 'चित्त चांगल्या प्रकारे समाधिस्थ झाल्यावर (सत्याचे) ज्ञान झाल्यावर आणि धम्माचे सम्यक् दर्शन झाले असता, स्त्री-भाव आमच्या (मार्गात) कोणते अडथळे आणू शकेल?'

या ग्रंथात अनेक महत्त्वपूर्ण संवाद आहेत. रोहिणी आणि तिच्या वडिलांचा संवाद, पुण्णिका आणि एका ब्राह्मणाचा संवाद, चापा आणि तिच्या पतीचा संवाद, चाला, सीसूपचाला व उप्पलवण्णा यांचा माराबरोबर झालेला संवाद, वड्‌ढमाता आणि तिच्या मुलाचा संवाद हे सर्व नाट्यशैलीने परिपूर्ण आहेत. अम्बपाली थेरीच्या गाथेतील जीवनाच्या अनित्यतेचे चित्रण पालि साहित्यातील उत्कृष्ट नमुना आहे यात शंका नाही.

शुद्धोदनाच्या मृत्यूनंतर भगवान बुद्धाने आपली सावत्र आई महापजापती गोतमी हिला भिक्खुणी होण्याची परवानगी दिली. तिच्याबरोबर पाचशे शाक्य महिला प्रव्रजित झाल्या. काही काळाने भिक्खुणींची संख्या वाढत जाऊन त्यांचा एक मोठा संघ तयार झाला. वेगवेगळ्या कुळांतून, निरनिराळ्या जातींतून आणि जीवनाच्या नाना प्रकारच्या अवस्थांमधून प्रव्रजित होऊन त्यांनी तथागताचा परमशांतीचा मार्ग स्वीकारला होता. त्यांच्यापैकीच काही थेरी आपला जीवनानुभव सांगून गेल्या. यातील काही थेरी राजकुळातील, काही शाक्य व लिच्छवी मंत्र्यांच्या मुली, काही ब्राह्मण कुळातील, काही व्यापारी वर्गातील, अड्‌ढकासी, अभयमाता, विमला आणि अम्बपाली ह्या गणिका होत्या. सुभा सोनाराची मुलगी तर चापा पारध्याची मुलगी होती. पुण्णिका दासी होती.

सर्वच भिक्खुणींनी आपल्या पूर्वजीवनासंबंधीची माहिती आपल्या गाथांमध्ये दिलेली नाही. त्यामुळे 'थेरीगाथा' या मूळ ग्रंथावरून त्यांचे जीवनचरित्र समजून घेणे कठीण जाते. परंतु 'अपदान' या ग्रंथात थेरींच्या जीवन-चरित्राविषयी माहिती मिळते. त्याचप्रमाणे कोणत्या उद्देशाने, कोणत्या कारणाने, कोणत्या सामाजिक परिस्थितीत प्रत्येक थेरी बुद्ध, धम्म व संघाला शरण गेली याचे विस्तृत विवरण आचार्य धम्मपाल यांनी थेरीगाथा ग्रंथावर लिहिलेल्या 'परमत्थदीपनी' या अट्ठकथेत उपलब्ध आहे. भाषांतरापूर्वी दिलेल्या थेरीच्या

जीवनासंबंधीची माहिती ‘अपदान’ आणि ‘परमत्थदीपनी’ या ग्रंथातून घेण्यात आली आहे. अशाप्रकारे या ग्रंथातील थेरींच्या गाथांमधून आणि त्यांच्या पूर्व जीवनचरित्रावरून इ. स. पू. पाचव्या व सहाव्या शतकातील स्त्रीजीवनाचे चित्र वाचकांपुढे उभे राहण्यास मदत होईल.

आधुनिक विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे, तंत्रविज्ञान आणि वैद्यकशास्त्र या विषयावरील ग्रंथ, त्याचप्रमाणे प्राचीन भारतीय संस्कृती, इतिहास, कला, शिल्प इत्यादी विषयांवरील विविध ग्रंथ मराठी भाषेत उपलब्ध करावेत या उद्देशाने महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने अनेकविध योजना आखल्या आहेत. त्यापैकी भाषांतरमाला ही एक महत्त्वपूर्ण योजना असून या योजनेच्या अंतर्गत पालि साहित्यातील ‘धम्मपद’ या अत्यंत महत्त्वाच्या ग्रंथाचे भाषांतर मंडळाने प्रकाशित केले आहे. त्यानंतर हा ग्रंथ प्रकाशनाकरिता घेतला आहे. त्याबद्दल मंडळाचे तत्कालीन अध्यक्ष तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा मी अत्यंत आभारी आहे.

पालि भाषा आणि साहित्याचे सुप्रसिद्ध विद्वान डॉ. पु. वि. बापट यांनी ग्रंथाचे हस्तलिखित परिश्रमपूर्वक तपासून दिले आणि बहुमोल मार्गदर्शन करून अनेक उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

मध्यंतरीच्या काळात महाराष्ट्र राज्यात अनेक स्थित्यंतरे झालीत. साहित्य संस्कृती मंडळाचे अनेक अध्यक्षही बदलले त्यामुळे अनेक वर्षे ग्रंथाचे भाषांतर मंडळाच्या कार्यालयात धूळ खात परंतु सुखरुप पडून राहिले.

सामाजिक बांधीलकीची जाण असलेले डॉ. य. दि. फडके साहित्य संस्कृती मंडळाच्या अध्यक्षपदावर आले. त्यांनी मात्र भाषांतरावरील धूळ झटकून ते प्रकाशनासाठी घेतले त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडे आहेत. मंडळाचे एक सदस्य डॉ. एस. एस. भोसले यांनी या कामी बरेच परिश्रम घेतले त्याबद्दल त्यांचे आभार मानतो. मंडळाचे सचिव श्री. चंद्रकांत वडे यांनी आपल्या कार्याच्या व्यापातून वेळ काढून ‘थेरीगाथा’ ग्रंथाच्या भाषांतराचे प्रकाशन लवकर व्हावे यासाठी तत्परतेने **लक्ष** घातले त्याबद्दल त्यांचे आभार मानतो.

शासकीय मुद्रणालय वाईचे कर्तव्यदक्ष आणि कुशल व्यवस्थापक श्री. उ. स. सोनवणे आणि त्यांचा कुशल कर्मचारीवर्ग यांनी ग्रंथाच्या छपाईचे कार्य अत्यंत सुबक असे केले त्याबद्दल या सर्वांचे मनः पूर्वक आभार मानतो. औरंगाबादेतील उदयोन्मुख चित्रकार श्री. शीतल शहाणे यांच्या कुंचल्यातून ग्रंथाचे मुखपृष्ठ साकार झाले. त्यांचाही मी आभारी आहे.

औरंगाबाद
आश्विन पौर्णिमा **प्रा. डॉ. शेषराव कचरुजी मेश्राम**
३० ऑक्टोबर १९९३

## अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

# पहिला वर्ग
# पहिला निपात

## १. एक अज्ञात भिक्खुणी

वैशालीमध्ये एका क्षत्रिय कुळात जन्म. एका चांगल्या घराण्यातील पुरुषाशी विवाह झाला होता. एके दिवशी महापजापती गोतमीचा उपदेश ऐकून प्रव्रज्या घेण्याची इच्छा झाली. परंतु पतीची आज्ञा न मिळाल्यामुळे गृहिणी राहूनच धम्माचे पालन करू लागली. चित्त धम्म-चिंतनाकडे लागले होते. एके दिवशी स्वयंपाक करीत असतांना विस्तव जास्त लागल्यामुळे कढईत शिजत असलेली भाजी करपून गेली. या घटनेने तिला संसारातील सर्व वस्तूंच्या अनित्यतेचे गंभीर ज्ञान झाले. त्यामुळे किंमती वस्त्रालंकार वापरण्याचे सोडून दिले. पतीने यासंबंधी विचारल्यावर ती म्हणाली, 'स्वामी ! सांसारिक जीवन जगण्यास मी स्वतःला असमर्थ समजत आहे.' हे ऐकून तिच्या पतीने महापजापती गोतमीकडे जाऊन विनंती केली व म्हटले, 'आर्ये! हिला प्रव्रज्या द्यावी.' तेव्हा महापजापती गोतमीने तिला प्रव्रज्या देऊन शास्त्याकडे नेले. शास्त्याने तिची महान वैराग्यवृत्ती पाहून ज्या घटनेने तिच्यामधील अंतर्दृष्टी जागृत झाली ती ध्यानात घेऊन खालील गाथा म्हटली. हीच गाथा ती वारंवार स्वतःसाठी म्हणताना दिसत असे. त्यामुळे ही गाथा तिच्या नावाबरोबर जोडण्यात आली आहे.

**थेरी! तू आपल्या हाताने तयार केलेले चीवर अंगावर**
**घेऊन सुखाने झोप. कारण भांड्यात घातलेल्या सुकलेल्या**
**भाजीप्रमाणे तुझा राग शांत झाला आहे. ॥१॥**

## २. मुत्ता

श्रावस्तीमधील एका ब्राह्मण कुळात जन्म. वयाच्या विसाव्या वर्षी गृहत्याग केला. महापजापती गोतमीजवळ प्रव्रज्या घेऊन तिची विद्यार्थिनी झाली. एके दिवशी भिक्षा मागणे संपल्यावर व जेवण झाल्यावर एका निर्जन ठिकाणी ध्यानभावनेकरिता बसली. तेव्हा शास्त्याने गंधकुटीत बसूनच जणू काही तिच्यापुढे प्रगट होऊन तिला उत्साहित करण्याकरिता खालील गाथा म्हटली. नंतर ही गाथा मुत्ता (मुक्ता) स्वतःसाठी वारंवार म्हणत होती. त्यामुळे ही गाथा तिच्या नावाबरोबर जोडण्यात आली आहे.

**मुत्ते! तू राहूच्या ग्रहणापासून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणे**
**(सर्व) श्रृंखलातून मुक्त हो. विमुक्ती-प्राप्त चित्ताने**
**ऋणमुक्त होऊनच तू भिक्षान्न खा. ॥२॥**

## ३. पुण्णा

श्रावस्तीमध्ये एका शाक्य कुटुंबात जन्म. महापजापती गोतमीचा उपदेश ऐकून गृहत्याग केला. तिच्याच जवळ वयाच्या विसाव्या वर्षी प्रव्रज्या घेतली. एके दिवशी अंतर्दृष्टीच्या विकासाकरिता ध्यानभावना करीत बसली असतांना भगवान बुद्धाने आपल्या अलौकिक प्रभावाने गंधकुटीत बसूनच तिच्यापुढे खालील गाथा म्हटली. नंतर ही गाथा पुण्णा (पूर्णा) वारंवार म्हणू लागली. ही तिचीच गाथा म्हणून ओळखली जाते.

**पुण्णे! तू पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे (कल्याणकारी)**
**धम्मामध्ये पूर्णत्व प्राप्त कर व परिपूर्ण प्रज्ञेने अंधकार**
**नष्ट कर. ॥३॥**

## ४. तिस्सा-पहिली

कपिलवस्तूमध्ये शाक्य कुळात जन्म. महापजापती गोतमीकडून प्रव्रज्या घेऊन निर्वाण साधना करण्याचा प्रयत्न करू लागली. पुण्णा भिक्खुणीप्रमाणेच तिच्याकरिता अभिप्रेत बुद्धगाथा ऐकली व त्या गाथेची पुनरावृत्ती वारंवार करू लागली. कालांतराने ही गाथा तिस्सा (तिष्या) हिच्या नावाने ओळखली जाऊ लागली.

**तिस्से! तू शिक्षण घे. त्याचा प्रयत्न सोडू नकोस. सर्व**
**(सांसारिक) बंधनापासून विमुक्त होऊन व अनाश्रव**
**(निर्मल-चित्त) होऊन जगात विचरण कर. ॥४॥**

## ५. तिस्सा-दुसरी

या भिक्खुणीची जीवनकथा सुद्धा पहिल्या तिस्सेप्रमाणे आहे. ही भिक्खुणी झाल्यावर अर्हत्पदास प्राप्त झाली. त्याचप्रमाणे धीरा, वीरा, मित्ता, भद्दा, उपसमा आदी पाच भिक्खुणींचे जीवनचरित्र सारखेच आहे. या सर्व कपिलवस्तूमध्ये राहणाऱ्या होत्या. सर्वांचा जन्म शाक्य कुळात झाला होता. सर्वांनी महापजापती गोतमीकडून प्रव्रज्या घेऊन निब्बाण-साधना केली होती. भगवान बुद्धाने त्यांना उद्देशून म्हटलेल्या गाथा त्या वारंवार उच्चारित असत. म्हणूनच ह्या गाथा त्यांच्या नावावर संग्रहीत झाल्या.

**तिस्से! तू कल्याणकारी धम्माच्या प्राप्तीसाठी प्रयत्न**
**कर. क्षणही व्यर्थ जाऊ देऊ नकोस. वेळ व्यर्थ**
**घालविलेले (लोक) दुर्गतीला प्राप्त होऊन शोक करतात. ॥५॥**

## ६. धीरा

**धीरा! तू समाधी प्राप्त कर. इंद्रिय ज्ञानाची शांती**
**परम सुख आहे. सर्वश्रेष्ठ आणि महान कल्याणकारक**
**निर्वाणाची आराधना कर. ॥६॥**

## ७. वीरा

**भिक्खुणी वीरा! तू दृढ साधनेने श्रद्धादी जीवन-शक्तींचा**
**विकास केलास. आता तू मार (विकार) आणि त्याच्या**
**सैन्याला पराजित करून अंतिम देह धारण करीत राहा. ॥७॥**

## ८. मित्ता

**भिक्खुणी मित्ता! तू श्रद्धेने प्रव्रजित झाली आहेस. आता**
**तू (सर्व प्राणीमात्राविषयी) मैत्री भावना बाळग. आणि**
**सर्वश्रेष्ठ व कल्याणकारक निब्बाणप्राप्तीसाठी कुशल**
**धम्माची भावना कर. ॥८॥**

## ९. भद्दा

**भद्दे! तू श्रद्धेने प्रव्रजित झाली आहेस. आता तू कल्याणकारक**
**धम्मामध्ये लीन हो. आणि सर्वश्रेष्ठ व कल्याणकारक**
**निब्बाणची व कुशल धम्माची भावना कर. ॥९॥**

## १०. उपसमा

**उपसमे! तू तरुन जाण्यास कठीण असा मृत्यूचे लक्ष्य**
**बनलेला (संसार) प्रवाह तरुन (पलीकडे) जा. आता**
**तू मार आणि त्याच्या सैन्याला पराजित करून अंतिम**
**देह धारण करीत राहा. ॥१०॥**

## ११. मुत्ता-दुसरी

कोशल देशातील ओघाटक नावाच्या ब्राह्मणाच्या कुटुंबात हिचा जन्म झाला होता. वयात आल्यावर एका दरिद्री व ठेंगण्या ब्राह्मणाशी तिचा विवाह झाला. 'मला सांसारिक जीवन आवडत नाही' असे तिने पतीला सांगितले. शेवटी पतीची आज्ञा मिळाल्यावर ती प्रव्रजित झाली.विपस्सना (विपश्यना) ध्यान साधनेसाठी तिने खूप प्रयत्न केले. तरीसुद्धा चित्त बाह्यवस्तूकडे आकर्षित होत होते. परंतु शेवटी चित्ताचे दमन करून तिने अर्हत्त्व प्राप्त केले. परमपद प्राप्त झाल्याच्या आनंदाने खालील उत्स्फूर्त गाथा (उदान) ती वारंवार म्हणत असे :-

**मी सुमुक्त झाली आहे. मी चांगल्याप्रकारे मुक्त झाली**
**आहे. मी तीन कुटिल वस्तूंपासून मुक्त झाली आहे.**
**उखळ, मुसळ व कुबड्या पतीपासून त्याचप्रमाणे जन्ममरणापासून**
**सुद्धा मी मुक्त झालेली आहे. माझी तृष्णा**
**समूळ नष्ट झाली आहे. ॥११॥**

## १२. धम्मदिन्ना

राजगृह नगरीत एका वैश्य कुळात जन्म. विशाख नावाच्या एका वैभवसंपन्न व्यापाऱ्याशी तिचा विवाह झाला होता. एके दिवशी तिचा पती भगवान बुद्धाच्या दर्शनाकरिता गेला असतांना भगवंतांचा धम्म ऐकल्यावर त्याला

अनागामी पद प्राप्त झाले. त्यानंतर घरी परत आल्यावर प्रासादावर चढत असतांना जिन्यावर धम्मदिन्नेने हात पुढे करून आधार दिला. परंतु त्याने प्रतिसाद दिला नाही व जेवतांना सुद्धा काही न बोलता गप्प राहिला. तेव्हा तिने विचारले, 'माझ्याकडून काही अपराध घडला काय?' यावर पतीने उत्तर दिले, 'धम्मदिन्ने! तुझ्याकडून कसलाही अपराध घडला नाही. परंतु मीच आजपासून स्त्री-शरीरास स्पर्श करण्यास व जेवणात स्वाद-लोलुप होण्यास असमर्थ झालो आहे. त्यामुळे तुझी इच्छा असेल तर या घरात राहा. नाहीतर जेवढी संपत्ती तुला पाहिजे तेवढी घेऊन आईवडिलांच्या घरी परत जा.' धम्मदिन्ना माहेरी न जाता तिने प्रव्रज्या घेऊ देण्याची पतीला विनंती केली. प्रव्रजित झाल्यावर तिने एकांत व निर्जन ठिकाणी साधना केली. ती धम्म-प्रचारक भिक्खुणीमध्ये श्रेष्ठ समजली जात असे. तिने अल्पावधीतच अर्हत्पद प्राप्त केले होते. आनंदाने तिच्या तोंडून पुढील उद्गार निघाले :-

**जे अंतःकरणपूर्वक अंतिम ध्येयाची (परम शांतीची) इच्छा**
**करतात व ज्यांचे चित्त कामतृष्णेपासून अलिप्त असते ते**
**ऊर्ध्वस्रोत म्हटले जातात. ॥१२॥**

## १३. विशाखा

जीवन-चरित्र भिक्खुणी धीराप्रमाणे. विमुक्ती सुखाचा अनुभव घेत असता तिने खालील गाथा म्हटली :-

**जे करून पश्चात्ताप करावा लागत नाही त्या बुद्धशासनाचे**
**(पूर्ण) पालन करा. ताबडतोब पाय धुवून एका बाजूला**
**बसा. ॥१३॥**

## १४. सुमना-पहिली

जीवनचरित्र भिक्खुणी तिस्सा हिच्याप्रमाणे. भगवान बुद्धाने तिच्यापुढे प्रगट होऊन तिला प्रोत्साहन देण्याकरिता खालील गाथा म्हटली :-

**(संसारातील) धातू दुःखदायक आहेत हे पाहून पुन्हा**
**जन्म घेऊ नकोस. संसाराची आसक्ती नष्ट केल्यावर तू शांत**
**होऊन विचरण करशील. ॥१४॥**

## १५. उत्तरा

जीवनचरित्र भिक्खुणी तिस्साप्रमाणे. अर्हत्पद प्राप्त केल्यावर तिने खालील उद्गार काढले :-

**मी काया, वाचा आणि मनाने संयमित होते. तृष्णा**
**मुळासकट उपटून मी आज शांत व निब्बाण प्राप्त झालेली**
**आहे. ॥१५॥**

## १६. सुमना-दुसरी

श्रावस्तीमध्ये जन्म झाला होता. ही कोशल देशाचा राजा प्रसेनजिताची बहीण होती. भगवान बुद्धाने प्रसेनजित राजाला दिलेला उपदेश ऐकून तिच्या मनात धम्माप्रती श्रद्धा उत्पन्न झाली. त्यामुळे बुद्ध, धम्म व संघाला शरण जाऊन व शील ग्रहण करून ती उपासिका झाली परंतु पुष्कळ दिवसपर्यंत तिने प्रव्रज्या घेतली नव्हती. तिची आजी जिवंत असल्याकारणाने आजीची सेवा करावी हा लवकर प्रव्रज्या न घेण्यामागचा उद्देश होता. परंतु आजी मरण पावल्यावर भावाची परवानगी घेऊन ती म्हातारपणी प्रव्रजित झाली. भगवंतांनी तिचे ज्ञान पाहून तिला खालील गाथा सांगितली. ही गाथा ती वारंवार म्हणत असे. शेवटी तिला अर्हत्त्वाची प्राप्ती झाली.

**हे वृद्ध भिक्खुणी! तू स्वतःच्या हाताने तयार केलेले**
**चीवर अंगावर पांघरून सुखाने झोप. कारण तुझी आसक्ती**
**नष्ट झाली असून तू निब्बाण प्राप्त व शांत झाली आहेस. ॥१६॥**

## १७. धम्मा

श्रावस्तीमधील एका चांगल्या घराण्यात जन्म झाला होता. वयात आल्यावर एका अनुरूप अशा पुरुषाशी विवाह झाला. धम्माप्रती खूप श्रद्धा उत्पन्न झाली होती. परंतु पतीची परवानगी न मिळाल्याने संघात प्रवेश मिळविता आला नाही. पती मरण पावल्यानंतर मात्र ती भिक्खुणी झाली. एके दिवशी भिक्षा मागून परत येत असतांना विहाराच्या जवळच अशक्तपणामुळे खाली पडली. तीच ध्यान-साधना आहे असे समजून समाधिस्थ झाली आणि शेवटी अर्हत्पद प्राप्त केले. या आनंदाच्या भरात तिच्या तोंडून खालील उद्‌गार निघाले :-

**एक दिवस भिक्षा मागण्याकरिता (खूप दूरपर्यंत) फिरून**
**(विहाराकडे परत येत असताना) अशक्तपणामुळे काठीचा**
**आधार घेऊन सुद्धा अंग थरथर कापत असतांना मी**
**(खाली) जमिनीवर पडले. शरीराचा हा दोष पाहून माझे**
**चित्त विमुक्त झाले. ॥१७॥**

## १८. सङ्घा

जीवनचरित्र भिक्खुणी धीराप्रमाणे आहे. आपला जीवनानुभव कथन करतांना सङ्घा म्हणते :-

**प्रव्रजित होऊन मी घर सोडले, मुलांना आणि प्रिय पशूंना**
**सोडले. (अशाप्रकारे) राग, द्वेष व अविद्या सोडून मी**
**विरक्त झाले. तृष्णा मुळासकट उपटून शांत झाले व**
**निब्बाण प्राप्त केले. ॥१८॥**

# दुसरा वर्ग
# दुसरा निपात

## १९. अभिरूपा नंदा

कपिलवस्तू नगरीतील खेमक नावाच्या एका क्षत्रियाच्या कुटुंबात जन्म. तिचे नाव नंदा ठेवण्यात आले होते. परंतु अतिशय रूपवान असल्यामुळे अभिरूपा हे विशेषण तिच्या नावाबरोबर जोडले जात होते. ती वयात आल्यावर चरभूत नावाच्या एका क्षत्रिय शाक्यकुमाराबरोबर तिचे लग्न ठरले. परंतु लग्नाच्या दिवशीच तो मरण पावला. त्यामुळे आईवडिलांनी तिची इच्छा नसतानासुद्धा तिला प्रव्रजित केले. संघात प्रवेश घेतल्यावरही तिचा सौंदर्याचा गर्व नाहीसा झाला नाही. ती आपले सौंदर्य पाहून आनंदित होत असे. तसेच तिला त्याचा अभिमानही वाटत होता. भगवान बुद्ध रूपसौंदर्याचे दुष्परिणाम दाखवितात या भीतीने ती भगवंताकडे जात नव्हती. ती ज्ञान प्राप्त करून घेण्यास पात्र आहे हे पाहून भगवान बुद्धाने महापजापती गोतमीला सर्व भिक्खुणींना क्रमाक्रमाने उपदेश ग्रहण करण्याकरिता पाठविण्यास सांगितले. परंतु जेव्हा नंदा भिक्खुणीचा क्रम आला तेव्हा तिने आपली प्रतिनिधी म्हणून दुसऱ्याच एका भिक्खुणीला पाठविले. त्यावर भगवंत म्हणाले, 'स्वतःचा क्रम आल्यावर स्वतः आले पाहिजे. दुसऱ्या भिक्खुणीला पाठवू नये.' यावेळी मात्र ती भगवंताच्या आज्ञेचे उल्लंघन करू शकत नसल्यामुळे इतर भिक्खुणींसह भगवंताकडे गेली. भगवान बुद्धाने आपल्या अलौकिक योग-सामर्थ्याने एका अतिशय सुंदर स्त्रीचे दर्शन तिला घडविले. त्यानंतर त्या स्त्रीची म्हातारपणची अवस्था दाखविली. तेव्हा तिच्यामध्ये विरक्ती उत्पन्न झाली. भगवंतांनी तिला दोन गाथा सांगितल्या. दुसरी गाथा ऐकल्यावर तिला अर्हत्त्व प्राप्त झाले. ह्या दोन्ही गाथा ती सतत म्हणत असे :-

**नंदा! व्याधीग्रस्त, अशुद्ध आणि दुर्गन्धयुक्त असे हे शरीर**
**पहा. एकाग्र व समाधीयुक्त चित्ताने (शरीरातील)**
**अशुभाची भावना कर. ॥१९॥**

**अहंकार-रूपी मळ नष्ट कर (संस्कार निमित्तापासून)**
**मुक्त असे जे) अनिमित्त (निब्बाण आहे) त्याची भावना**
**कर. अहंकार नष्ट झाल्यावर तू शांत व निर्मल चित्त**
**होऊन विचरण करशील. ॥२०॥**

## २०. जेन्ती

वैशालीतील लिच्छवी राजकुळात जन्म. भगवंताचा उपदेश ऐकून अर्हत्पद प्राप्त झाले. स्वतःला झालेल्या दिव्य ज्ञानाचा साक्षात्कार पाहून ती आनंदाने या दोन गाथा नेहमी म्हणू लागली :-

**निब्बाण प्राप्तीचे मार्ग म्हणून जी सात बोधिअंगे आहेत**
**त्या सर्वांची मी भगवान बुद्धाने उपदेशिल्याप्रमाणे भावना**
**केली. ॥२१॥**
**मी त्या भगवान बुद्धाचे दर्शन घेतले. (मला अनुभव**

**झाला की) हे माझे शेवटचे शरीर आहे. माझे आवागमन**
**(जन्म घेणे व मरणे) संपले. आता माझा पुनर्जन्म**
**होणार नाही. ॥२२॥**

## २१. सुमंगल-माता

श्रावस्ती येथील एका दरिद्री कुटुंबात जन्म झाला होता. बुरुडकाम करणाऱ्या एका पुरुषाशी तिचे लग्न झाले. तिला पहिला मुलगा झाला. त्याचे सुमंगल असे नाव ठेवले. तेव्हापासून तिला सुमंगल-माता असे संबोधण्यात येऊ लागले. सुमंगलसुद्धा प्रसिद्ध भिक्खु झाला. प्रव्रजित झाल्यावर थोड्याच दिवसात त्याला अर्हत्त्व प्राप्त झाले. त्यामुळे तो सुमंगल थेर या नावाने ओळखला जाऊ लागला. सुमंगल-माता प्रव्रजित झाल्यावर एके दिवशी आपल्या कष्टपूर्ण व दरिद्री सांसारिक जीवनाचे स्मरण करीत असतांना तिच्या चित्तात अधिकच वैराग्य उत्पन्न झाले त्यामुळे अधिक जोमाने प्रयत्न करून तिने परमज्ञान प्राप्त केले. अर्हत्त्व प्राप्तीच्या आनंदात तिच्या तोंडून खालील गाथा उत्स्फूर्तपणे बाहेर पडल्या :-

**अहो! मी मुक्त झाले आहे. माझी मुक्ती धन्य आहे. मी**
**मुसळापासून मुक्त झाले आहे. तसेच निर्लज्ज पतीपासून**
**व छत्र्या करण्याच्या कामापासून मुक्त झाले आहे. तसेच**
**अन्न शिजविण्याच्या भांड्यालाही पाणसापाचा दुर्गन्ध**
**येत आहे. ॥२३॥**

**(परंतु आज) मी राग व द्वेष नष्ट करून विहार करीत**
**आहे. झाडाखाली जाऊन 'अहो मी किती सुखी आहे'**
**अशा प्रकारे सुखाने ध्यान करीत आहे. ॥२४॥**

## २२. अड्ढ कासी

काशी देशातील एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या घरी जन्म झाला होता. परंतु काही कारणामुळे ती वेश्या झाली. कालांतराने भिक्खुणींच्या जवळ प्रव्रजित झाली. 'श्रावस्तीला जाऊन भगवान बुद्धाचा उपदेश प्रत्यक्ष ग्रहण करावा' अशी तिची प्रबळ इच्छा होती. परंतु दुसऱ्या वेश्यांनी तिच्या मार्गात अनेक अडथळे आणले. तेव्हा तिने भगवंताजवळ एक दूत पाठविला व उपसम्पदा (भिक्खुणीपदाची दीक्षा) मिळण्याकरिता भगवंतांना विनंती केली. भगवंतांनी तिची विनंती मान्य करून तिला उपसम्पदा दिली. अशाप्रकारे मोठ्या कष्टाने उपसम्पन्न झाल्यावर तिने लवकरच दिव्यज्ञान प्राप्त केले. अर्हत्पद प्राप्त झाल्यावर तिने आनंदित होऊन पुढील उद्‌गार काढले :-

**काशी देशाचे जेवढे उत्पन्न होते तेवढेच उत्पन्न माझे होते.**
**त्यापेक्षा कमी मूल्य घेऊन मी कोणत्याही मनुष्याला**
**आपली सेवा देत नव्हते. ॥२५॥**

**परंतु आज मी त्या सौंदर्यापासून विरक्त झाले आहे**

**(त्या मोहापासून) मुक्त होऊन मी वैराग्ययुक्त झाले**
**आहे. जन्म-मरणाच्या फेऱ्यात मी पुनः पुनः धावणार**
**नाही. मी तीन विद्यांचा साक्षात्कार केला आणि भगवान**
**बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले आहे. ॥२६॥**

## २३. चित्ता

राजगृहातील एका धनाढ्य नागरिकाच्या कुटुंबात जन्म झाला. राजगृहाच्या प्रवेशद्वाराजवळ पहिल्यांदा भगवान बुद्धाचा उपदेश ऐकला. तेव्हापासून धम्माप्रती श्रद्धा वाढली. त्यामुळे महापजापती गोतमीजवळ जाऊन प्रव्रज्या घेतली. वृद्धावस्थेत गृघ्रकूट पर्वतावर जाऊन व तेथे ध्यानभावना करून दिव्यपद प्राप्त केले. आपला अनुभव कथन करतांना ती म्हणते :-

**मी कृश, आजारी आणि अतिशय दुर्बल असूनसुद्धा काठी**
**टेकत टेकत जाऊन पर्वतावर चढले. ॥२७॥**

**(खांद्यावरील) संघाटी खाली ठेवली व भिक्षापात्र उलटे**
**केले. पर्वतावरील दगडाच्या सहाय्याने मी स्वतःला स्थिर**
**केले (आणि त्याबरोबर) माझा अज्ञानांधकार नष्ट झाला. ॥२८॥**

## २४. मेत्तिका

राजगृहातील एका श्रीमंत ब्राह्मणाच्या कुटंबात जन्म. पर्वतावर जाऊन श्रमण धम्माप्रमाणे साधना करू लागली व थोड्याच कालावधीत तिला अर्हत्पद प्राप्त झाले. आनंदित झाल्यामुळे खालील उद्‌गार काढले :-

**मी दुःखित, दुर्बल आणि तारुण्य नष्ट झालेली असूनसुद्धा**
**काठी टेकत टेकत जाऊन पर्वतावर चढले. ॥२९॥**

**(खांद्यावरील) संघाटी खाली ठेवली आणि भिक्षापात्र**
**सुद्धा उलटे केले. मी पर्वत शिखरावर बसले तेव्हा माझे**
**चित्त विमुक्त झाले. मी तीन विद्यांचा साक्षात्कार केला**
**आणि भगवान बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले. ॥३०॥**

## २५. मित्ता

कपिलवस्तूमधील शाक्य राजकुळात या थेरीचा जन्म झाला होता. भगवान बुद्धाचा उपदेश ऐकून धम्माप्रती श्रद्धा जागृत झाली व काही दिवसानंतर ती तथागताची उपासिका बनली. कालांतराने महापजापती गोतमीजवळ प्रव्रजित झाली. थोड्याच दिवसांत दीर्घ साधना केल्यामुळे तिला अर्हत्त्व प्राप्त झाले. स्वतःच्या पूर्वजन्माचे स्मरण करीत ती आनंदाने गाऊ लागली :-

**चतुर्दशी, पौर्णिमा आणि दोन्ही पक्षातील अष्टमी तसेच**
**पाटिहारिय पक्षाच्या दिवशी मी आठशीलाचे (व्रताचे)**
**पालन करीत असे. देवयोनीत जन्म व्हावा या इच्छेने**
**उपोसथ ग्रहण करीत असे. ॥३१॥**

**ती मी आज एकवेळ जेवण करणारी, मुंडण केलेली व**
**चीवर धारण करणारी आहे. अंतःकरणातील भीती नष्ट**
**झाल्यामुळे देवयोनीची मी इच्छा करीत नाही. ॥३२॥**

## २६. अभय-माता

उज्जैनी नगरीत जन्म झाला होता. ही त्या नगरीतील प्रसिद्ध गणिका होती. तिचे नाव पद्मावती असे होते. बिम्बिसार राजाने तिच्या रूपसौंदर्याचे बाबतीत ऐकून पुरोहिताला सांगितले, 'उज्जैनीतील पद्मावतीला पाहण्याची इच्छा आहे.' तेव्हा पुरोहिताने राजाशी पद्मावतीची भेट घडवून आणली. त्यानंतर राजापासून तिला एक मुलगा झाला. त्याचे अभय असे नाव ठेवण्यात आले. तो सात वर्षाचा झाल्यावर पद्मावतीने त्याला राजाकडे पाठविले. राजाने पुत्राप्रमाणे त्याला वाढविले. काही वर्षांनी त्याला धम्माप्रती श्रद्धा उत्पन्न झाली त्यामुळे तो प्रव्रजित झाला. मुलाचा उपदेश ऐकून काही दिवसांनी त्याची आईसुद्धा प्रव्रजित झाली. विपस्सना साधना करीत तिने दिव्यज्ञान प्राप्त केले. मुलाने दिलेला उपदेश ती वारंवार म्हणू लागली :-

**"हे आई! पायाच्या तळव्यापासून वर (डोक्यापर्यंत)**
**आणि डोक्यावरील केसापासून खाली (तळव्यापर्यंत)**
**तू या अशुद्ध व दुर्गंधयुक्त शरीराचे निरीक्षण कर." ॥३३॥**

**अशा प्रकारे (उपदेश ऐकून) आचरण करीत असता**
**माझी संपूर्ण वासना समूळ नष्ट झाली. दाह (पीडा)**
**शांत झाला. निब्बाण प्राप्त करून मी परमशांती**
**मिळविली आहे. ॥३४॥**

## २७. अभया

उज्जैनीमध्ये उच्च कुळात जन्म. ही अभयमातेची मैत्रीण होती. अभयमाता प्रव्रजित झाली तेव्हा ही सुद्धा प्रव्रजित झाली. राजगृहात राहात असतांना एके दिवशी अशुभ भावनेकरिता अरण्यात गेली. भगवान बुद्ध त्यावेळी गंधकुटीमध्ये बसले होते. आपल्या योगसामर्थ्याने जणू काही तिला ते उपदेश करीत आहेत असे भासले. भगवंतांचा उपदेश ऐकल्यावर तिला अर्हत्त्व प्राप्त झाले. तेव्हापासून ती खालील गाथा सतत म्हणू लागली :-

**"अभये! हा देह भग्न होणारा आहे (असे असूनसुद्धा)**
**येथे अज्ञानी लोक आसक्त आहेत. संपूर्ण जाणीव ठेवून**
**व स्मृतिमान होऊन मी हा देह सोडीन." ॥३५॥**

**मी पुष्कळ दुःखद गोष्टीशी (सामना करीत) दक्ष राहून तृष्णेचा नाश केला आणि भगवान बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले. ॥३६॥**

## २८. सामा-पहिली

कौशाम्बीमधील एका प्रतिष्ठित कुळात जन्म झाला. कौशाम्बीचा राजा उदयन ह्याच्या पत्नीची ही मैत्रीण होती. उदयनाची पत्नी सामावती मरण पावल्यामुळे ही शोकमग्न झाली आणि भिक्खुणीकडे जाऊन प्रव्रज्या घेतली. परंतु सतत चिंताग्रस्त राहिल्यामुळे आर्यमार्गाचा सम्यक् अभ्यास करू शकली नाही. अशाप्रकारे पंचवीस वर्षे निघून गेली. शेवटी आनंद थेराचा उपदेश ऐकून चित्त एकाग्र करण्याचा खूप प्रयत्न केला. त्यानंतर दिव्यज्ञानाचा साक्षात्कार झाला. स्वतःच्या पूर्वजीवनाचे अवलोकन करीत असतांना तिने ह्या दोन गाथा म्हटल्या :-

**चार पांचदा विहारातून (चित्तशांतीसाठी) बाहेर पडले. परंतु चित्त ताब्यात नसल्यामुळे चित्ताला शांती मिळाली नाही. ॥३७॥**

**माझी ही आठवी रात्र आहे, माझी तृष्णा समूळ नष्ट झाली. तेव्हापासून मी पुष्कळ दुःखद गोष्टीशी (सामना करीत) दक्ष राहून तृष्णेचा नाश केला आणि भगवान बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले. ॥३८॥**

# तिसरा वर्ग
# तिसरा निपात

## २९. सामा-दुसरी

कौशाम्बीतील एका कुलीन घराण्यात जन्म. कौशाम्बी नरेश उदयन ह्याच्या पत्नीचे नाव शामावती असे होते. तिची ही मैत्रीण. शामावती मरण पावल्यामुळे ही सुद्धा प्रव्रजित झाली. २५ वर्षपर्यंत दिव्यज्ञान प्राप्त करू शकली नाही. म्हातारपणी बुद्धोपदेश ऐकून खूप साधना केली व शेवटी दिव्यज्ञान मिळविले. स्वतःच्या पूर्वजन्माचे अवलोकन करीत असतांना तिच्या तोंडून खालील उद्‌गार सहजपणे निघाले :-

**प्रव्रज्या घेऊन पंचवीस वर्षे झाली तरी मला चित्ताची**
**शांती मिळाली असे वाटत नाही. ॥३९॥**

**चित्त ताब्यात नसल्यामुळे चित्त शांती लाभली नाही.**
**तेव्हा भगवान बुद्धाचा उपदेश स्मरण करून मला वैराग्य**
**प्राप्त झाले. ॥४०॥**

**मी पुष्कळ दुःखद गोष्टीशी (सामना करीत) दक्ष राहून**
**तृष्णेचा नाश केला आणि भगवान बुद्धाच्या शासनाप्रमाणे**
**आचरण केले. तृष्णा नष्ट केल्यावरची ही माझी सातवी**
**रात्र आहे. ॥४१॥**

## ३०. उत्तमा

श्रावस्तीमधील एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या घरी जन्म झाला होता. पटाचारा भिक्खुणीचा उपदेश ऐकून संघात प्रवेश केला. परंतु पुष्कळ दिवसपर्यंत परमज्ञानाची प्राप्ती करणे शक्य झाले नाही. पटाचारेने तिच्या चित्ताची अशी अवस्था पाहून विशेष उपदेश केला. तो ऐकून उत्तमा परिश्रमपूर्वक साधना करू लागली. त्यामुळे तिला परमज्ञानाचा साक्षात्कार झाला. ज्ञानप्राप्तीने आनंदित होऊन ती खालील गाथा सतत म्हणू लागली :-

**चार पाच वेळा (चित्तशांतीसाठी) विहारातून बाहेर**
**पडले. परंतु चित्त ताब्यात नसल्यामुळे चित्तशांती मिळाली**
**नाही. ॥४२॥**

**जी माझी श्रद्धेया होती त्या भिक्खुणीकडे मी गेले. तिने**
**मला स्कन्ध, आयतन व धातू यांचा उपदेश दिला. ॥४३॥**

**तिने मला जसा उपदेश केला, तसा तिचा धम्म ऐकून मी**
**एक आठवडा एकाच (ध्यान) आसनावर बसून ध्यानाच्या**

अनुक्रमणिका

**आनंदाचा अनुभव घेऊ लागले. आठव्या दिवशी मी**
**पाय पसरले तेव्हा माझा अज्ञानान्धकार नष्ट झाला होता. ॥४४॥**

## ३१. उत्तमा-दुसरी

कोशल देशात एका प्रतिष्ठित ब्राह्मण कुळात जन्म. भगवान बुद्ध कोशल देशात चारिका (पायी प्रवास) करीत असतांना एके दिवशी त्यांचा धम्म ऐकला व प्रव्रजित होऊन ध्यान-साधना केली व थोड्याच अवधीत अर्हत्पद प्राप्त केले. आपला अनुभव सांगतांना ती म्हणते :-

**जी ही सात बोधि-अंगे आहेत ती निब्बाण प्राप्तीचे मार्ग**
**आहेत. भगवान बुद्धाने उपदेशिल्याप्रमाणे त्या सर्वांची**
**मी भावना केली (अभ्यास केला).॥४५॥**

**शून्यता (राग, द्वेष, मोह आदीपासून शून्य अवस्था) व**
**अनिमित्त (असे जे निब्बाण) ते मी इच्छेप्रमाणे प्राप्त केले**
**आहे. मी भगवान बुद्धाची वारस-कन्या आहे. मी**
**निब्बाणाचा आनंद नेहमी भोगीत आहे. ॥४६॥**

**(माझ्या) सर्व कामवासना, दिव्य आणि मानवी, नष्ट**
**झाल्या आहेत. माझे (जन्म-मरणाच्या फेऱ्यातील)**
**आवागमन थांबले. आता माझा पुनर्जन्म नाही. ॥४७॥**

## ३२. दन्तिका

श्रावस्तीमध्ये कोशल नरेशाच्या ब्राह्मण पुरोहिताच्या घरी जन्म. जेवताना धम्म ऐकला तेव्हापासून धम्मावरील श्रद्धा वाढत गेली. नंतर दन्तिका धम्माची उपासिका बनली. महापजापती गोतमीजवळ प्रव्रज्या घेतली. राजगृहात राहत असतांना एके दिवशी ध्यानभावना करण्यासाठी गृध्रकूट पर्वतावर गेली. तेथे बसली असतांना माहुताला पाठीवर बसण्यासाठी पाय पसरणाऱ्या हत्तीला पाहिले. ह्या हत्तीलाच ध्यानाचा आधार मानून ती ध्यानस्थ झाली व दिव्यज्ञान प्राप्त केले. त्या दृश्याचे वर्णन करतांना ती म्हणते :-

**गृध्रकूट पर्वतावरील दुपारच्या ध्यान-स्थानातून मी बाहेर**
**पडले (त्यावेळी) पाण्यात डुंबून बाहेर नदीच्या किनाऱ्यावर**
**आलेल्या हत्तीला पाहिले. ॥४८॥**

**एका अंकुशधारी मनुष्याने 'पाय दे' अशी याचना केली,**
**हत्तीने पाय पसरला (पुढे केला) व मनुष्य हत्तीवर चढला. ॥४९॥**

**(सहजासहजी) वश न होणाऱ्या (हत्तीला) वश**
**झालेला व मनुष्यांच्या आधीन झाल्याचे पाहून त्या**

**(निर्जन) अरण्यात गेल्यावर मी सुद्धा आपले चित्त**
**समाधिस्थ केले. (चित्ताचे दमन केले). ॥५०॥**

## ३३. उब्बिरी

श्रावस्तीमध्ये कुलीन घराण्यात जन्म झाला होता. ही दिसायला अतिशय सुंदर होती. त्यामुळे कोशल राजाच्या अंतः पुरात तिला स्थान मिळाले. काही वर्षांनी तिला एक मुलगी झाली. तिचे 'जीवन्ती' असे नाव ठेवले. मुलगी सुंदर आहे हे पाहून राजाला खूप आनंद झाला. त्याने प्रसन्न होऊन उब्बिरीला राणीचे पद दिले. परंतु थोड्याच दिवसांनी 'जीवन्ती' मरण पावली. या घटनेने उब्बिरी अत्यंत शोकाकुल झाली. ज्या स्मशानभूमीत मुलीचा अग्निसंस्कार करण्यात आला होता त्या स्मशानात जाऊन ती दिवसभर रडत असे. एके दिवशी ती भगवंताकडे गेली. त्यांना वंदन करून थोडा वेळ तेथे बसून राहिली व नंतर निघून गेली. त्यानंतर अचिरवती नदीच्या किनाऱ्यावर जाऊन तेथेसुद्धा मुलीच्या शोकाने पुनः रडू लागली. भगवान बुद्धाने गंधकुटीमध्ये बसूनच हे दृश्य पाहिले आणि आपल्या योग-सामर्थ्याने जणू काही तिच्यापुढे उभे राहून विचारले, 'उब्बिरी! तू विलाप (शोक) का करतेस?' 'भन्ते! मी आपल्या मुलीसाठी विलाप करते' असे उब्बिरीने उत्तर दिले. यावर भगवंत उब्बिरीला पुनः म्हणाले, 'उब्बिरी, या स्मशानात तुझ्या चौऱ्यांशी हजार मुलींचा अग्नीसंस्कार झालेला आहे. त्यातील कोणत्या मुलीकरिता तू विलाप करीत आहेस?' लगेच भगवंतांनी तिला स्मशानात नेऊन ज्या ज्या ठिकाणी तिच्या पूर्वजन्मातील मुलींना जाळले होते ती ती ठिकाणे दाखविली व गाथा सांगितल्या. अर्हत्पद प्राप्त केल्यावर ती ह्या गाथा सतत म्हणत असे :-

**'अम्म जीवा' असे म्हणून तू वनामध्ये (भटकून) रडत**
**आहेस. हे उब्बिरी तू स्वतःचा शोध घे. 'जीवन्ती' असे**
**नाव असलेल्या तुझ्या चौऱ्यांशी हजार मुली येथे जाळल्या**
**गेल्या आहेत. त्यांच्यापैकी कोणासाठी तू शोक करीत**
**आहेस ? ॥५१॥**

भगवान बुद्धाचे हे वचन ऐकून उब्बिरीला आत्मबोध झाला. ती ध्यानामध्ये तल्लीन झाली. तेव्हा तिला दिव्यज्ञानाचा लाभ झाला. त्यानंतर शोकापासून विमुक्त झाल्यावर ती म्हणते :-

**माझ्या हृदयाला टोचलेला दुर्दर्श बाण निघाला. शोकाकुल**
**झालेल्या मला आता मुलीचा शोक राहिला नाही. ॥५२॥**

**आज माझे हृदय शांत, दुःखरहित आहे. शल्य बाहेर**
**उपटून टाकले आहे. मी भगवान बुद्ध, त्यांचा धम्म आणि**
**संघाला शरण जाते. ॥५३॥**

## ३४. सुक्का

राजगृह नगरीतील एका प्रतिष्ठित घराण्यात जन्म झाला होता. राजगृहात भगवान बुद्धाचा उपदेश ऐकून धम्मावर गाढ श्रद्धा बसली. त्यानंतर धम्मदिन्ना भिक्खुणीचा उपदेश ऐकल्यावर संसारापासून विरक्त होऊन

तिच्याच जवळ प्रव्रज्या घेतली. साधना करीत असता अल्पावधीतच अर्हत्पद प्राप्त केले. पाचशे भिक्खुणींच्या संघासह धम्मप्रचार करू लागली. धम्मोपदेश करण्यात ही अतिशय निष्णात होती. एके दिवशी तिने राजगृहात भिक्षा मागितली. जेवण आटोपून भिक्खुणी-निवासात गेली. तेथे असलेल्या भिक्खुणी-संघाला मोठ्या प्रभावाने उपदेश केला. या उपदेशाने सर्व श्रोते मंत्र-मुग्ध झाले. उपदेश संपल्यावर त्या ठिकाणी एका वृक्षावर वास करणारी देवता ह्या धम्मोपदेशाने खूपच प्रसन्न झाली व राजगृहामध्ये ठिकठिकाणी सुक्का थेरीचे गुणगान करू लागली.

**"राजगृहातील नागरिकांनो, तुम्ही दारू प्यायल्याप्रमाणे कां**
**झोपत आहात? बुद्ध शासनाचा उपदेश देणाऱ्या सुक्का**
**भिक्खुणीची उपासना कां करीत नाही? ॥५४॥**

**ज्याप्रमाणे प्रवासी मेघातून (खाली पडणारे) पाणी**
**पितात, त्याप्रमाणे तिची निब्बाणाप्रत नेणारी, ओजपूर्ण**
**आणि जात्याच रसाळ वाणी ज्ञानी लोक पितात असे**
**वाटते. ॥५५॥**

वृक्षदेवतेचे हे उद्गार ऐकून नागरिक धावत धावत तेथे गेले. सुक्का थेरीचा उपदेश ऐकून तृप्त झाले व शेवटी सर्व नागरिक तिचे गुणगान करू लागले :-

**'सुक्का थेरी! तू पवित्र गोष्टीच्या अभ्यासाने पवित्र**
**झाली आहेस. वासनांपासून विमुक्त होऊन चांगल्याप्रकारे**
**समाधिस्थ झाली आहेस. माराला (विकाराला) त्याच्या**
**सैन्यासह जिंकून तू अंतिम देह धारण करीत आहेस. ॥५६॥**

## ३५. सेला

ही आळवी देशाच्या राजाची मुलगी होती. शास्त्याने आळविक राजाला दिलेला उपदेश ऐकून तिच्यामध्ये धम्मश्रद्धा उत्पन्न झाली. प्रथम भगवंताची उपासिका बनली. त्यानंतर प्रव्रजित होऊन संघात प्रवेश केला. एके दिवशी विरक्त होऊन ऐहिक वस्तूंवर विचार करीत दिव्यज्ञान प्राप्त केले. अर्हत्पद प्राप्त झाल्यावर श्रावस्तीमध्ये राहू लागली. एके दिवशी जेवण आटोपल्यावर दिवसाच्या ध्यानभावनेकरिता अन्धवनात गेली व एका झाडाखाली बसली. तेव्हा मार (मनातील विकार) तिला तिच्या एकाकी जीवनापासून परावृत्त करण्याच्या उद्देशाने म्हणाला :-

**हे सेला! जगामध्ये मुक्ती नाही. तेव्हा एकाकी राहण्याचा**
**काय उपयोग? कामसुखाचा उपभोग घे. शेवटी पश्चात्ताप**
**करणारी होऊ नकोस. ॥५७॥**

माराचे हे प्रलोभनकारक वचन ऐकून सेला विचार करू लागली, ‘हा मूर्ख मार माझ्या मार्गात अडथळे आणण्यासाठी अशा प्रकारच्या इंद्रियासक्तीच्या गोष्टी बोलत आहे. परंतु मी अर्हत्पद-प्राप्त साधिका आहे हे कदाचित त्याला माहीत नसावे. मी त्याला यथायोग्य उत्तर देईन’ असा निश्चय करून ती म्हणाली :-

**पापी मारा! शरीराला विद्ध (घायाळ) करणाऱ्या**
**भाल्याच्या टोकाप्रमाणे कामवासना आहेत. त्यांच्यामुळे**
**स्कन्धमय (प्राण्यांचा) नाश होतो व ज्याला तू कामसुख**
**म्हणतोस त्याबाबतीत मला आता अनासक्ती आहे. ॥५८॥**

**माझी तृष्णा सर्व ठिकाणातून नष्ट झाली आहे. माझा**
**अज्ञानान्धकार सुद्धा नष्ट झाला आहे. हे पापी मारा!**
**प्राण्याचा नाश करणाऱ्या! आज तुझाच नाश झालेला**
**आहे हे जाणून घे. ॥५९॥**

## ३६. सोमा

राजगृह नगरीत जन्म. सोमा बिम्बिसार राजाच्या पुरोहिताची मुलगी होती. भगवान बुद्धाने राजगृहात प्रवेश केल्यावर त्यांचा धम्मोपदेश ऐकून श्रद्धा उत्पन्न झाली. त्यामुळे बुद्धाची उपासिका बनली. काही दिवसांनंतर संसारापासून उदासीन झाल्यामुळे भिक्खुणी संघात प्रवेश केला. परिश्रमपूर्वक ध्यानसाधना करीत असता अल्पावधीत अर्हत्पदाचा लाभ झाला. श्रावस्तीमध्ये राहत असतांना एके दिवशी दिवसाच्या ध्यानसाधनेसाठी अन्धवनात गेली व एका झाडाखाली बसली. तेव्हा तिच्या मार्गात अडचणी आणण्याकरिता मार तिला म्हणाला :-

**“जे स्थान (पद) प्राप्त करण्यास ऋषींनासुद्धा अत्यंत**
**कठीण आहे, ते दोन अंगुली-प्रज्ञाच असलेल्या स्त्रियांनी**
**प्राप्त करणे शक्य नाही.”॥६०॥**

यावर भिक्खुणी म्हणाली :-

**हे मारा! चित्त चांगल्याप्रकारे समाधिस्थ झाल्यावर**
**(सत्याचे) ज्ञान झाल्यावर आणि धम्माचे सम्यक् दर्शन**
**झाले असताना स्त्री-भाव आमचे (मार्गात) कोणते अडथळे**
**आणू शकेल? (स्त्री असल्यामुळे निर्वाण मार्गात अडथळे**
**येऊ शकत नाहीत.) ॥६१॥**

**माझी तृष्णा सर्व ठिकाणातून नष्ट झाली आहे. माझा**
**अज्ञानान्धकार सुद्धा नष्ट झाला आहे. हे पापी मारा!**
**प्राण्यांचा नाश करणाऱ्या! आज तुझाच नाश झालेला**
**आहे हे जाणून घे. ॥६२॥**

# चौथा वर्ग
# चौथा निपात

## ३७. भद्दा कपिलानी

वाराणसीमध्ये एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या घरी जन्म झाला होता. पूर्व कर्मामुळे शरीरातून दुर्गन्धी येत होती. त्यामुळे लोकामध्ये तिला फार लाज वाटत असें व या कारणाने जीवनाचा उबग आला होता. एके दिवशी विरक्त होऊन स्वतःचे दागिने मोडून चैत्यामध्ये सुवर्णाची फरशी करून भगवंतांची कमळांनी पूजा केली. त्याचक्षणी शरीरातून येणारी दुर्गन्धी नष्ट झाली.त्यानंतर दुसऱ्या जन्मात ती वाराणसीच्या राजाची मुलगी म्हणून जन्माला आली. ती मोठ्या ऐश्वर्यात राहत होती. दीर्घकाळ प्रत्येक बुद्धाची सेवा करीत होती. काही दिवसांनी संसाराला कंटाळून तपस्विनी झाली व अरण्यात ध्यानभावना करीत राहू लागली. त्यानंतर सागल नावाच्या नगरीत (सध्याचे सियालकोट) कोसिय गोत्राच्या ब्राह्मणाच्या घरी जन्मली. वयात आल्यावर महातीर्थ गावातील पिप्पलकुमाराबरोबर विवाह झाला. पिप्पलकुमार (महाकाश्यप) प्रव्रजित झाल्यावर भद्दा कपिलानीनेसुद्धा त्याच्याबरोबर गृहत्याग केला. पाच वर्ष तित्थियाराम नावाच्या विहारात राहिली व नंतर महापजापती गोतमीजवळ प्रव्रजित झाली. थोड्याच दिवसांनी उपसम्पदा घेऊन ध्यानसाधना करीत अर्हत्पद प्राप्त केले. अर्हत्त्व प्राप्त केल्यावर पूर्वीचा पती महाकाश्यप थेर ह्याचे गुण वर्णन करण्याकरिता व स्वतः कृतकृत्य झाल्याचे सांगतांना खालील गाथा तिने म्हटल्या :-

**समाधि-निष्ठ महाकस्सप भगवान बुद्धाचा वारसपुत्र आहे.**
**तो पूर्वजन्म जाणतो, सुगती व दुर्गती पाहतो. ॥६३॥**

**तो पुनर्जन्माचा नाश झालेला मुनी आहे. त्याने अभिज्ञेमध्ये**
**(दिव्यज्ञान) पूर्णत्व प्राप्त केले आहे. या तीन विद्यांनी**
**युक्त असा तो (खरा) त्रैविद्य ब्राह्मण आहे.॥६४॥**

**त्याच्याचप्रमाणे भद्दा कपिलानी सुद्धा तीन विद्या जाणणारी,**
**मृत्यूवर विजय मिळविलेली आहे. माराला (चित्तविकाराला)**
**त्याच्या सैन्यासह जिंकून तो अंतिम देह**
**धारण करीत आहे. ॥६५॥**

**जगातील (सांसारिक जीवनातील) दुष्परिणाम पाहून**
**आम्ही दोघेही प्रव्रजित झालो. आम्ही दोघेही आश्रव**
**(चित्तातील दूषित विचार) नष्ट झालेले आत्मविजयी,**
**परमशांत आणि निब्बाण प्राप्त झालेले आहोत. ॥६६॥**

## पाचवा वर्ग
## पाचवा निपात

### ३८. अज्ञात भिक्खुणी

देवदह नगरीत जन्म झालेला होता. घराण्याची माहिती उपलब्ध नाही. महापजापती गोतमीची दाई म्हणून ही काम करीत होती. महापजापती गोतमीबरोबर ही सुद्धा प्रव्रजित झाली होती. प्रव्रजित झाल्यावर सुद्धा चित्त कामवासनेने पीडित असल्यामुळे पंचवीस वर्षपर्यंत चित्ताची एकाग्रता साधण्यास असमर्थ राहिली. या असमर्थतेमुळे नेहमी रडत असे. एके दिवशी तिने धम्मदिन्ना थेरीचा उपदेश ऐकला. त्यामुळे तिची इंद्रिय-वासना नाहीशी झाली व चित्त शांत झाले. अशाप्रकारे थोड्याच दिवसात तिने ध्यानसाधना करीत अर्हत्पद प्राप्त केले. आपली साधना सफल झाल्याच्या आनंदाने ती म्हणते :-

**मी प्रव्रजित झाल्यापासून पंचवीस वर्षपर्यंत चित्ताची शांती**
**क्षणभरही प्राप्त केली नाही. ॥६७॥**

**कामवासनेने पीडित असल्यामुळे चित्तशांती मिळाली**
**नाही. (या परिस्थितीत) दोन्ही हात उंच करून मी**
**विहारात प्रवेश केला. ॥६८॥**

**जी माझी श्रद्धेया भिक्खुणी होती तिच्याकडे मी गेले.**
**तिने मला स्कन्ध, आयतन आणि धातू या धम्मांचा**
**उपदेश दिला. ॥६९॥**

**तिचा धम्म ऐकून मी एका बाजूला बसले. मी (माझे)**
**पूर्वजन्म जाणते. माझे दिव्यचक्षू विशोधित आहेत. ॥७०॥**

**परचित्त ज्ञान मला उपलब्ध झाले आहे. माझे श्रोत**
**(कान) विशोधित आहेत. दिव्यशक्तीचा साक्षात्कार मी**
**करून घेतला आहे. माझे आश्रव (चित्तातील दूषित**
**विचार) नष्ट झाले आहेत. त्याचप्रमाणे सहा अभिज्ञांचा**
**मी साक्षात्कार करून घेतला आहे आणि भगवान बुद्धाच्या**
**शासनाप्रमाणे आचरण केले आहे. ॥७१॥**

### ३९. विमला

वैशालीतील एका वेश्येच्या पोटी जन्म. आईप्रमाणे वाईट मार्गाने जीवन घालवीत होती. एके दिवशी विमलाने महामोग्गल्लान थेर ह्याला मोहित करण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी महामोग्गल्लान थेर वैशालीमध्ये भिक्षाटन करीत होते. त्यांना पाहून आसक्त झाली व त्यांच्या निवासस्थानी जाऊन त्यांना मोहित करण्याचा प्रयत्न

करू लागली. थेराने तिला अशुभ भावनेचा उपदेश दिला व चांगली कान उघाडणी केली. उपदेश ऐकल्याबरोबर वेश्यावृत्तीबद्दल तिला लाज वाटू लागली. धम्माप्रती श्रद्धा जागृत होऊन ती भगवान बुद्धाची उपासिका झाली. काही दिवसानंतर वैराग्य वाढल्याने संघात प्रवेश घेतला. अल्पावधीत अर्हत्पदाचा साक्षात्कार केला. आपल्या पूर्वजीवनाचे स्मरण करतांना ती म्हणते:-

**रूप, कांती, सौभाग्य व यशाने मी उन्मत्त झाले, त्याचप्रमाणे**
**तारुण्याने गर्विष्ठ होऊन मी स्वतःला दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ**
**समजत होते. ॥७२॥**

**मूर्ख ज्याचा बडेजाव करतात अशा शरीराला सुंदर रीतीने**
**विभूषित करून, शिकारी (मृगांना भुलविण्याकरिता)**
**पाश टाकतो त्याप्रमाणे वेश्याघराच्या दारामध्ये मी उभी**
**राहत असे. अलंकाराचे प्रदर्शन करीत, (मधून मधून)**
**गुह्यांगाचे प्रदर्शन करीत, निरनिराळे प्रलोभनीय हावभाव**
**करीत बऱ्याच लोकांची चेष्टामस्करी करीत असे. ॥७३-७४॥**

**ती मी आज मुण्डन करून, चीवर नेसून, भिक्षा मागून**
**अवितर्क ध्यानाचा (समाधीची दुसरी अवस्था) लाभ**
**करून झाडाखाली बसलेली आहे. ॥७५॥**

**दिव्य आणि मानवी (वासनांची) सर्व बंधने तुटली आहेत,**
**सर्व आश्रव (चित्तातील वाईट विचार) दूर फेकून मी**
**परमशांत व निब्बाणप्राप्त झालेली आहे. ॥७६॥**

## ४०. सीहा

वैशाली मध्ये जन्म झाला होता. सीहा सिंहसेनापतीच्या बहिणीची मुलगी होय. मामाच्या नावावरून तिचे 'सीहा' असे नाव ठेवण्यात आले होते. एके दिवशी भगवान बुद्ध सिंहसेनापतीला उपदेश देत असता तिला धम्माविषयी श्रद्धा उत्पन्न झाली. आई-वडिलांची आज्ञा घेऊन प्रव्रजित झाली. परंतु महान साधना करूनसुद्धा चित्त बाह्य वस्तूकडे धाव घेत असल्यामुळे व मिथ्यावितर्कामुळे सात वर्षपर्यंत चित्ताला शांती लाभली नाही. एक दिवस अगदी हताश होऊन विचार करू लागली, 'या पापी जीवनाचा काय उपयोग' व लगेच एका झाडावर स्वतःला गळफास लावून आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला. गळयाभोवती गळफास टाकल्याबरोबर चित्त ध्यानस्थ झाले. या आनंदाच्या भरात तिच्या तोंडून खालील गाथा बाहेर पडल्या :-

**विपर्यस्त विचारामुळे मी कामवासनेने नेहमी पीडित राहत**
**असे, चित्त ताब्यात नसल्यामुळे मी पूर्वी प्रक्षुब्ध होते. ॥७७॥**

**वस्तूंचे (केवळ) शुभ स्वरूपच पाहत असल्यामुळे मी**
**क्लेश-पीडित असे. चित्त तृष्णेत फसले असल्यामुळे**

**चित्ताला शांती (केव्हाच) लाभली नाही.॥७८॥**

**(चित्तशांतीचा लाभ न झाल्यामुळे) मी कृश, पांडुरोग्याप्रमाणे
व कांतीहीन होऊन सात वर्षे घालविली.
अत्यंत दुःखी अशा मला दिवसा अथवा रात्री सुखाचा
अनुभव आला नाही. ॥७९॥**

**त्यानंतर (हताश होऊन ) दोर घेऊन मी वनामध्ये प्रवेश
केला. 'हीन आचरण पुनः करण्यापेक्षा वर टांगून घेऊन
(आत्महत्या करणेच) माझ्याकरिता श्रेयस्कर आहे'
(असा विचार केला.) ॥८०॥**

**गळफास पक्का बांधून तो झाडाच्या फांदीला बांधला.
गळफास गळ्यावर टाकला. त्याचक्षणी माझे चित्त
(तृष्णेपासून) विमुक्त झाले. ॥८१॥**

## ४१. सुन्दरी नन्दा

कपिलवस्तूमध्ये शाक्य कुळात जन्म झालेला होता. 'नन्दा' असे तिचे नाव ठेवण्यात आले होते. परंतु अत्यंत सौंदर्यसम्पन्न असल्यामुळे तिचे 'सुन्दरी नन्दा' असे नाव पडले. लोक तिला 'जनपद-कल्याणी' (मुलुखातील अतिशय सुंदर स्त्री) असे म्हणत असत. बुद्धत्त्वाचा लाभ झाल्यावर भगवान बुद्ध कपिलवस्तूमध्ये पहिल्यांदा आले असता शाक्य राजकुमार नंद व राहुलकुमार प्रव्रजित झाले. महाराज शुद्धोदन मरण पावल्यावर महापजापती गोतमी सुद्धा प्रव्रजित झाली. तेव्हा सुन्दरी नन्दाने विचार केला, 'माझे सर्व नातलग प्रव्रजित झाले. या परिस्थितीत मी घरात राहून काय करू?' या विचाराने लगेच भिक्खुणीकडे जाऊन प्रव्रजित झाली. परंतु तिची ही प्रव्रज्या श्रद्धेने झाली नव्हती तर नातलगांच्या स्नेहामुळे झाली होती. म्हणून तिला अजूनही आपल्या सौंदर्याचा गर्व वाटत होता. भगवान बुद्ध सौंदर्याचा तिरस्कार करतात या भीतीने 'अभिरूपानन्दा' या भिक्खुणीप्रमाणे ही सुद्धा त्यांच्यासमोर जात नव्हती. तेव्हा शास्त्याने तिला उपदेश केला. तरुण स्त्री क्रमाक्रमाने म्हातारी होते. हे ऐकून सुन्दरी नन्देला जीवनाची अनित्यता व दुःख यांचा साक्षात्कार झाला व शेवटी तिचे चित्त सांसारिक अवस्थेपासून विरक्त झाले. शास्त्याने तिला पुढील उपदेश दिला :-

**"नन्दे! व्याधियुक्त, अशुद्ध आणि दुर्गन्धयुक्त हे शरीर
पहा. एकाग्र आणि चांगल्या प्रकारे समाधियुक्त होऊन तू
चित्ताने अशुभाची भावना कर. ॥८२॥**

**जसे हे (शरीर दुर्गन्धयुक्त) आहे तसे ते आहे आणि
जसे ते (शरीर) आहे तसे हे आहे. दुर्गन्धयुक्त, सडलेला
वास मारणारे असे हे शरीर असून त्याचे मूर्खांकडून
अभिनंदन केले जाते. ॥८३॥
अशाप्रकारे हे नन्दे! रात्रंदिवस अनाळशी होऊन (त्याचे)**

अनुक्रमणिका

**निरीक्षण कर. त्यानंतर तू स्वतःच्या ज्ञानाने उद्वेग पावून**
**(सत्य) पाहशील.” ॥८४॥**

भगवंतांचा हा उपदेश ऐकून नन्दा भिक्खुणीला ज्ञानाचा लाभ झाला आणि ती आनंदाने उद्गारली :-

**“याप्रमाणे मी अनाळशी होऊन चित्ताने संयुक्तिक विचार**
**केल्यावर आतून व बाहेरून हे शरीर यथार्थपणे पाहिले. ॥८५॥**

**तेव्हा शरीराबद्दल उबग प्राप्त झाला, अन्तर्यामी मी विरक्त**
**झाले. दक्ष, अनासक्त, परमशांत अशा मला निब्बाण प्राप्त**
**झाले आहे. ॥८६॥**

## ४२. नन्दुत्तरा

कुरु देशातील कम्मासदम्म या नावाच्या प्रसिद्ध नगरीत जन्म. ही एका ब्राह्मणाची मुलगी होती. विद्या व शिल्प यांचे ज्ञान करून घेऊन ती निर्ग्रंथांच्या (जैनाच्या) संघात दाखल झाली होती. ही वादविवाद करण्यात अतिशय निष्णात होती. भद्दाकुण्डलकेसीप्रमाणे संपूर्ण जम्बुद्वीपात वादविवाद करीत हिंडत होती. एके दिवशी अचानक हिची महामोग्गल्लान थेराशी गाठ पडली. दोघांचा वादविवाद झाला असता त्यांनी विचारलेल्या प्रश्नांना उत्तरे देऊ शकली नाही व अशा प्रकारे त्यांच्याकडून वादात हरली. त्यानंतर थेराचा उपदेश ऐकून प्रभावित झाली व शासनामध्ये प्रव्रजित झाली. कठोर साधना करून अर्हत्पद प्राप्त केले. आपल्या पूर्वजीवनाचा अनुभव कथन करतांना ती म्हणते :-

**अग्नी, चंद्र, सूर्य आणि (इतर अनेक) देवतांना मी**
**नमस्कार करीत होते. नदी-तीर्थावर जाऊन मी पाण्यात**
**डुंबत असे. ॥८७॥**

**अर्ध्या डोक्याचे मुंडण करून, मी जमिनीवर झोपत असे,**
**रात्री जेवण करीत नसे व अशाप्रकारे मी अनेक व्रतांचे**
**पालन करीत असे. ॥८८॥**

**दागिने, स्नान, सुगंधित लेपादीने मी स्वतःला सजविण्यात**
**व विभूषित करण्यात मग्न राहत असे. कामतृष्णेने पीडित**
**अशा या शरीराचे मी चोचले पुरवीत असे.॥८९॥**

**त्यानंतर (धम्माप्रती) श्रद्धा उत्पन्न होऊन मी बेघर**
**होऊन प्रव्रज्या ग्रहण केली. शरीराला यथार्थपणे पाहून**
**माझी कामतृष्णा समूळ नष्ट झाली. ॥९०॥**

**सर्व पुनर्जन्म नष्ट झाले. इच्छा आणि अभिलाषा संपल्या.**

**सर्व बंधने विछिन्न झाली व चित्ताला शांती मिळाली. ॥९१॥**

## ४३. मित्तकाली

कु रु देशातील कम्मासदम्म नगरीत एका ब्राह्मण कुळात जन्म. महासतिपट्ठान सुत्ताचा उपदेश ऐकून भिक्खुणी संघात प्रवेश केला. परंतु सात वर्षपर्यंत लाभ सत्काराची आसक्ती तिला वाटत होती. काही दिवसांनी यथार्थ विचार मनात आल्यावर सांसारिक गोष्टीपासून विरक्त झाली. महान साधना करून निब्बाणपद प्राप्त केले. आपल्या पूर्वजीवनाचे स्मरण झाल्यावर ती म्हणते :-

**मी श्रद्धेने प्रव्रज्या घेऊन घरातून बेघर होऊन लाभ**
**सत्काराला उत्सुक होऊन ठिकठिकाणी फिरत होते. ॥९२॥**

**परमार्थाची अवहेलना करून मी हीन गोष्टीच्या मागे**
**लागली होते. क्लेशांच्या आधीन होऊन मी श्रामण्याबद्दल**
**विरक्त होते. ॥९३॥**

**छोट्याशा विहारात बसले असतांना एक मनाची टोचणी**
**सुरू झाली. 'मी तृष्णेच्या जाळ्यात सापडून वाईट**
**मार्गाला लागले आहे.' ॥९४॥**

**माझे जीवित अल्प असून त्याला जरा व व्याधीपीडित**
**करीत आहेत. हे शरीर नष्ट झाले नाही तोपर्यंत मला**
**प्रमाद करण्यालाही फुरसत नाही. ॥९५॥**

**(पाच) स्कंधांचा उदय व नाश याचे यथार्थ दर्शन**
**करीत मी विमुक्त चित्त होऊन आसनावरून उठले, मी**
**बुद्ध शासनाप्रमाणे आचरण केले. ॥९६॥**

## ४४. सकुला

श्रावस्तीमध्ये एका ब्राह्मण कुटुंबात सकुला थेरीचा जन्म झाला होता. भगवान बुद्धाने जेतवनाचे दान स्वीकारतांना दिलेला उपदेश ऐकून त्यांची उपासिका बनली. ही काही दिवसांनी क्षीणाश्रव थेराचा धम्म ऐकून संसारापासून मन विरक्त झाले. त्यामुळे संघात प्रवेश केला. परिश्रमपूर्वक महान साधना करून दिव्यज्ञानाचा साक्षात्कार केला. दिव्यचक्षु प्राप्त केलेल्या भिक्खुणीमध्ये सकुला सर्वश्रेष्ठ समजली जात होती. आपल्या साधनेचा अनुभव कथन करतांना ती म्हणते :-

**मी (गृहिणी म्हणून) घरात राहत असतांनाच एका**
**भिक्खुणीचा उपदेश ऐकून विमल धम्म पाहिला आणि**
**(त्यामुळे) अच्युत पद निब्बाणाचे दर्शन घडले. ॥९७॥**

**पुत्र, कन्या, धन, धान्य या सर्वांना सोडून, केस मुण्डन करून व घरातून बेघर होऊन मी प्रव्रजित झाले. ॥९८॥**

**मी शिकत असतांनाच सरळ जाणाऱ्या मार्गाचे अनुसरण करू लागले. राग, द्वेष आणि त्याबरोबर येणारे आश्रव (चित्तमल) सोडून दिले. ॥९९॥**

**भिक्खुणी पदाकरिता उपसम्पदा घेतल्यावर मला माझ्या पूर्वजन्माचे स्मरण झाले. योग्यप्रकारे भावना केल्यामुळे विमल, विशुद्ध अशा दिव्यदृष्टीचा लाभ झाला. ॥१००॥**

**सर्व (प्रकारचे) संस्कार हे आपले नव्हंत. त्यांच्या बुडाशी काही कारण असून ते लोप पावणारे आहेत असे पाहून मी सर्व आश्रव (चित्तमल) सोडून दिले. (आता) मी परमशांत असून निब्बाणाचा साक्षात्कार केलेला आहे. ॥१०१॥**

## ४५. सोणा

श्रावस्तीमधील एका कुलीन घराण्यात सोणाचा जन्म झाला होता. विवाह झाल्यावर हिने दहा अपत्यांना जन्म दिला. त्यामुळे 'बहुपुत्तिका' (पुष्कळ अपत्ये असलेली) म्हणूनही ओळखली जात होती. पतीने प्रव्रज्या घेतल्यावर तिने मुला-मुलींवर घर सोपवून दिले. त्याचप्रमाणे सर्व संपत्ती त्यांना वाटून दिली. स्वतःसाठी काहीही ठेवले नाही. परंतु थोड्याच दिवसात तिची मुले आणि सुना तिचा अनादर करू लागले 'ज्या घरात आपला आदर नाही त्या घरात राहण्यात काय अर्थ?' असा विचार करून (एका) भिक्खुणीकडे जाऊन प्रव्रजित झाली. म्हातारी झाल्यावर गृहत्याग केल्यामुळे अविचल चित्तशांती मिळविण्यासाठी खूप साधना करावी लागली. शेवटी ती आपल्या ध्येयामध्ये सफल झाली. जीवनाचे ध्येय प्राप्त करण्यासाठी तिने केलेली दृढ साधना पाहून भगवान बुद्ध धम्मपदातील गाथा (१४५) म्हणाले, 'उत्तम धम्माची दखल न घेता शंभर वर्षे जगण्यापेक्षा उत्तम धम्माची दखल घेऊन एक दिवस जगणे श्रेयस्कर आहे.' दृढ साधना करणाऱ्या भिक्खुणींमध्ये ही सर्वश्रेष्ठ समजली जात असे. एके दिवशी आपल्या पूर्वजीवनाचे स्मरण करीत असता ती उद्‌गारली :-

**ह्या शरीररूपाने मी दहा पुत्रांना जन्म दिला. त्यामुळे मी दुर्बल आणि जीर्ण होऊन (एका) भिक्खुणीच्या जवळ गेले. ॥१०२॥**

**तिने मला स्कन्ध, आयतन आणि धातू यांचा उपदेश दिला. तिचा उपदेश ऐकून व केस मुण्डन करून मी प्रव्रजित झाले. ॥१०३॥**
**तिच्याजवळ शिकत असतांना मी दिव्य शुद्ध चक्षु प्राप्त केला. (त्यामुळे) जेथे मी पूर्वी वास केला असे पूर्वजन्म**

**जाणते.॥१०४॥**

**एकाग्र आणि समाधिस्थ होऊन मी अनिमित्त (रूपी निब्बाणाची) भावना करते. मुक्ती ताबडतोब प्राप्त झाली. अनासक्त होऊन मी निब्बाणाचा साक्षात्कार केलेला आहे. ॥१०५॥**

**पाच स्कन्ध मी जाणले. ते मुळासकट तुटून पडले आहेत. (अस्तित्वात) असलेल्या वस्तूबद्दल तृष्णा नाही. (त्यामुळे) आता माझा पुनर्जन्म नाही. ॥१०६॥**

## ४६. भद्दा-कुण्डलकेसा

राजगृहामध्ये एका व्यापाऱ्याच्या घरी जन्म. ही आपल्या मोठ्या परिवारामध्ये सुखसमाधानाने राहात होती. एकदा त्याच नगरातील राजपुरोहिताच्या सत्थुक नावाच्या मुलाने चोरीचा अपराध केला. त्यामुळे त्याला पकडून शिक्षा देण्यासाठी नगररक्षक घेऊन जात होते. त्याला पाहून भद्दा-कुण्डलकेसा त्याच्यावर मोहित झाली. 'तो मला मिळाला तरच मी जिवंत राहीन, अन्यथा मरेन' असा विचार करीत ती पलंगावर पडून राहिली. तिचे वडील नगराचे कोषाध्यक्ष होते. आपल्या एकुलत्या एक मुलीची इच्छा ऐकून व मुलीवर अतिशय प्रेम असल्यामुळे नगररक्षकांना त्याने एक हजार नाण्यांची लाच देऊन त्या मुलाची सुटका केली. सुगंधित पाण्याने स्नान घालून सर्व आभरणांनी अलंकृत करून त्याच्याबरोबर आपल्या मुलीचे लग्न लावून दिले. काही दिवस दोघे आनंदाने राहिले. परंतु सत्थुकाला भद्देच्या अंगावरील दागिन्यांचा दिवसेंदिवस मोह वाटू लागला. एके दिवशी त्याने भद्देला विश्वासात घेऊन म्हटले, 'चोरी करण्याच्या अपराधामुळे जेव्हा मला वध-स्थानकाकडे नेले जात होते तेव्हा मी वध–स्थानी असलेल्या देवतेला नवस केला की जर कोणत्याही प्रकारे माझी देहान्ताच्या शिक्षेपासून सुटका झाली तर मी देवतेची पूजा करीन. भद्दे, तू पूजेची तयारी कर.' हे ऐकून भद्देने पूजेची तयारी केली आणि दागदागिने व किमती वस्त्र परिधान करून ती पतीबरोबर पूजेला निघाली. सत्थुकाने त्याच्याबरोबर येणाऱ्या सेविकांना तेथेच थांबवून घरी पाठवून दिले व भद्देला एकटीला बरोबर घेऊन तो पर्वतावर चढू लागला. वाटेत तो तिच्याबरोबर बोलत नव्हता. तरीसुद्धा भद्दा त्याच्यावर अतिशय प्रेमासक्त असल्यामुळे काहीच (अशुभ) समजू शकली नाही. सत्थुकाने म्हटले, 'भद्दे, तुझ्या अंगावरील सर्व दागिने काढ.' यावर भद्देने म्हटले, 'स्वामी, माझ्याकडून काही अपराध घडला काय?' यावर त्या दुष्ट पतीने उत्तर दिले, 'हे मूर्खे, तुला काय वाटले? मी तुला येथे खरोखर पूजा करण्यासाठी आणले आहे? तुझे दागदागिने घेण्यासाठी मी तुला येथे आणले आहे.' 'परंतु स्वामी, हे दागदागिने कोणाचे आहेत? आणि मी कोणाची आहे?' तेव्हा तो म्हणाला, 'हे मला काही माहीत नाही.' भद्दा चतुर होती. तिने त्याच्या इच्छेप्रमाणे वागण्याची तयारी दाखविली. परंतु त्याला एक विनंती केली, 'आर्य ! मी तुमच्या आज्ञेप्रमाणे वागण्यास तयार आहे परंतु माझी एकच इच्छा पूर्ण करा. मला या वस्त्रालंकारांनी आपले आलिंगन घेऊ द्या.' या विनंतीचा त्याने स्वीकार केला तेव्हा आलिंगन घेण्याचे निमित्त करून भद्देने त्याला जोरदार धक्का मारला. त्याचक्षणी तो पर्वतावरून खाली कोसळला, शरीर चूर्णविचूर्ण झाले व तो तेथेच मरण पावला. तिचे चातुर्य पाहून त्या ठिकाणी राहात असलेली देवता प्रसन्न होऊन म्हणाली :-

'सर्व ठिकाणी पुरुष चतुर नसतात. काही ठिकाणी स्त्रियासुद्धा पुरुषापेक्षा चतुर असतात.' या विचित्र घटनेनंतर भद्देने विचार केला 'या अशा अवस्थेत घरी जाणे मला योग्य नाही. मी संसाराचा त्याग केला

पाहिजे.' लगेच ती एका जैन मुनीच्या आश्रमात गेली व तेथे जैन धर्माची दीक्षा घेतली. तेथे तिच्या केसांचे लुंचन करण्यात आले. काही दिवसांनी वाढून ते कुरळे कुण्डलासारखे झाले. त्यामुळे 'कुण्डलकेसा' असे नाव पडले. साधूंच्या आश्रमात तिने शास्त्रांचा खूप अभ्यास केला. त्यामुळे ती वादकुशल झाली होती. 'हे एवढेच जाणतात यापुढे जाणत नाहीत' असा विचार करून जैन साधूंच्या आश्रमातून बाहेर पडली आणि जेथे पण्डित होते तेथे तेथे जाऊन ज्ञान मिळवू लागली व वादविवाद करू लागली. वादविवादात ती इतकी कुशल झाली होती की, तिच्याबरोबर वाद करण्यास कोणीही तयार होत नसत. ज्या गावात जात असे त्या गावाच्या प्रवेशद्वाराजवळ वाळूचा ढीग करून त्यावर जांभळाच्या झाडाची फांदी रोवून ठेवत असे आणि 'जो माझ्याबरोबर वादविवाद करण्यास तयार आहे त्याने ही फांदी काढावी' असे आव्हान करीत असे. सात दिवसानंतर जर ती फांदी तेथून कोणी काढली नाही तर तेथून दुसऱ्या गावाला जात असे. अशाप्रकारे प्रवास करीत ती श्रावस्तीमध्ये आली. त्यावेळी भगवान बुद्ध श्रावस्तीमध्ये विहार करीत होते. आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे तिने नगराच्या प्रवेशद्वाराजवळ फांदी रोवून ठेवली. धम्मसेनापती सारिपुत्त एकटेच नगरात प्रवेश करीत होते. त्यांनी तेथे जमलेल्या मुलांना विचारले व फांदी उचलून घेतली. भद्देला ही गोष्ट कळली तेव्हा ती श्रावस्तीमध्ये गेली व 'शाक्यपुत्रीय श्रमणाबरोबर माझा वाद होणार आहे' असे सर्व नागरिकांना सांगितले. तेथे जमलेल्या नागरिकांबरोबर ती सारिपुत्ताकडे आली. त्या दोघांमध्ये धर्माविषयी वाद सुरू झाला. भद्देने सारिपुत्ताला अनेक प्रश्न विचारले. त्या सर्वांचे त्यांनी समाधानकारकपणे उत्तर दिले. शेवटी सारिपुत्ताने तिला एक प्रश्न विचारला, 'एक वस्तू काय आहे?' भद्दा या प्रश्नाचे उत्तर देऊ शकली नाही व ती सारिपुत्ताच्या पायावर डोके ठेवून विनंती करू लागली, 'भन्ते! मी तुम्हाला शरण जाते.' सारिपुत्ताने म्हटले,' 'मला शरण येऊ नकोस. श्रेष्ठ पुरुष भगवान बुद्धाला शरण जा.' संध्याकाळचे वेळी धम्मोपदेश सुरू असतांना ती शास्त्याकडे गेली व त्यांचे दर्शन घेऊन त्यांना शरण गेली. शास्त्याने तिला उपदेश दिला. काही दिवसांनी साधनेकरिता परिश्रम करून तिने अर्हत्पदाचा साक्षात्कार केला. त्या आनंदात तिने खालील उद्‌गार काढले :-

**केस कापलेली, धुळीने माखलेले एकच वस्त्र नेसून मी पूर्वी
फिरत असे. जे अवर्ज्य कर्म ते वर्ज्य आहे आणि जे वर्ज्य
कर्म आहे ते अवर्ज्य आहे असे मी मानत असे. ॥१०७॥**

**दुपारच्या ध्यान-स्थानातून मी बाहेर पडून गृध्रकूट
पर्वतावर भिक्खु संघाच्या पुढे असलेल्या विमल भगवान
बुद्धाला पाहिले.॥१०८॥**

**गुडघे टेकून, वन्दन करून व पुढे जाऊन मी हात जोडले.
(भगवान बुद्ध) 'भद्दे ये' असे मला म्हणाले. तीच
माझी उपसम्पदा झाली.॥१०९॥**

**(तेव्हापासून) मी अङ्ग, मगध, वज्जी, काशी आणि
कोशल देशात कोणाच्याही ऋणात न राहता पन्नास
वर्षे प्रवास केला व मी या राष्ट्रांचे अन्न खाल्ले. ॥११०॥
सर्व ग्रन्थीपासून मुक्त झालेल्या भद्देला ज्याने चीवर दिले
असा हा उपासक प्रज्ञावान (ज्ञानी) आहे. त्याने पुष्कळ**

**पुण्य संचित केले आहे. ॥१११॥**

## ४७. पटाचारा

श्रावस्तीमध्ये एका व्यापाऱ्याच्या घरी जन्म झालेला होता. वयात आल्यावर स्वतःच्या घरी काम करणाऱ्या एका नोकराच्या प्रेमात पडली. तिच्या लग्नाकरिता आईवडील इतरत्र प्रयत्न करू लागले. ते माहीत झाल्यावर ती त्या नोकराबरोबर पळून गेली. ते दोघेही एका गावात राहू लागले. तेथे राहात असतांनाच काही दिवसांनी ती गरोदर राहिली. बाळंतपण जवळ आल्यावर ती पतीला म्हणाली, 'स्वामी, या ठिकाणी अनाथासारखे राहण्यात काय अर्थ? आपल्या घरी जाऊ.' नवऱ्याने तिच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही व तो चालढकल करू लागला. तेव्हा एके दिवशी तो बाहेर गेल्यावर घरातील काम आटोपल्यानंतर 'तुमची पत्नी माहेरी गेली, असे माझ्या नवऱ्याला सांगा' असा शेजाऱ्यांकडे निरोप ठेवून एकटीच माहेरच्या रस्त्याला लागली. तो परत आल्यावर बायको घरी न दिसल्यामुळे 'माझ्यामुळे पत्नी अनाथ झाली' असा विचार करून तो तिच्या मागे मागे जाऊ लागला. शेवटी त्याने तिला रस्त्यात गाठले. ती वाटेतच प्रसूत झाली होती. तेव्हा ते दोघेही तेथूनच घरी परत आले. दुसऱ्या खेपेला गरोदर राहिली. त्यावेळी सुद्धा वरील प्रकारे एकटीच माहेरी जाण्यास निघाली परंतु यावेळी मात्र मोठे वादळ सुटले. आकाशात मेघ गोळा होऊन खूप पाऊस पडू लागला. विजा चमकू लागल्या व मेघ गर्जना होऊ लागली. ते पाहून ती नवऱ्याला म्हणाली, 'स्वामी (एखादे) आश्रयस्थान शोधून काढा' त्याने इकडे तिकडे शोध घेतला व गवताने झाकलेली एक वेलीची गुंफा पाहिली. तेथे आश्रय घेण्यासाठी तेथील जागा साफ करीत असतांना वारुळातून साप बाहेर निघून त्याला चावला. तो ताबडतोब तेथेच मरून पडला. इकडे पटाचारा बाळंत झाली व रात्रभर त्याच ठिकाणी पडून राहिली. सकाळ झाल्यावर नवजात अर्भकाला पोटाशी धरून व दुसऱ्याचा हात पकडून नवऱ्याचा इकडे तिकडे शोध घेऊ लागली. तेव्हा एका वारुळाजवळ नवरा मरून पडलेला तिला दिसला. 'माझ्यामुळे नवरा मरण पावला' असे म्हणून ती खूप रडू लागली. शेवटी निराश्रित झाल्यामुळे माहेरी जाण्याकरिता निघाली. रात्रभर पाऊस पडल्यामुळे जिकडे तिकडे पाणीच पाणी झाले होते. माहेरी जातांना रस्त्यामध्ये एक नदी लागली. शरीर दुर्बल झाल्यामुळे दोघाही मुलांना एकाच वेळी घेऊन नदी ओलांडणे शक्य वाटत नसल्यामुळे मोठ्या मुलाला अलिकडच्या किनाऱ्यावर ठेवून नवजात शिशुला पोटाशी धरून ती पलिकडच्या किनाऱ्यावर पोहोचली. तेथे झाडाच्या फांद्यांवर कापडात गुंडाळलेल्या त्या बालकाला ठेवले व मोठ्या मुलाला आणण्याकरिता ती पुनः नदीत उतरली व क्षणाक्षणाला मागे वळून पाहू लागली. ती नदीच्या मध्यभागी आल्यावर एका बहिरी ससाण्याने 'हा मांसाचा गोळा आहे' असे समजून नवजात बालकावर झडप घातली. ससाण्याला पाहून तिने दोन्ही हात उंच करून सू सू असा मोठ्याने आवाज केला. परंतु ती दूर असल्यामुळे त्याचा काही परिणाम झाला नाही. बहिरी ससाणा त्या शिशुला घेऊन आकाशात उडाला. इकडे नदीच्या काठावर उभ्या असलेल्या मुलाने 'आई हात उंच करून मोठ्या आवाजात मला आपल्याकडे बोलावीत आहे' असे समजून नदीच्या प्रवाहात प्रवेश केला व त्यामुळे वेगवान प्रवाहात वाहून गेला. अशा प्रकारे नवजात शिशुला ससाण्याने मारले व दुसरे बाळ प्रवाहात वाहून मरण पावले. हे सर्व डोळ्यादेखत घडलेले पाहून पटाचारा शोकाने वेडी झाली व आक्रोश करू लागली, 'माझा नवरा वाटेत मरण पावला, एका मुलाला ससाण्याने मारले व दुसरा प्रवाहात वाहून मरण पावला.' अशा प्रकारे शोकाकुल होऊन रडत रडत ती श्रावस्तीच्या मार्गाने जात असतांना तिला एक वाटसरू दिसला. त्याला तिने विचारले, 'कुठे राहणारा आहेस?' त्याने उत्तर दिले, 'आई, मी श्रावस्तीमध्ये राहणारा आहे.' तो आपल्या माहेरचा राहणारा आहे हे समजल्यावर तिने आपल्या वडिलांचा समाचार विचारला. तो म्हणाला, 'आई, आजच रात्री व्यापारी, त्याची पत्नी व त्याचा मुलगा असे तिघेही घर कोसळल्यामुळे मरण पावले. त्यांना एकाच चितेवर जाळले तोच हा धूर दिसत आहे.' दुःखात भर घालणारी

ही वार्ता ऐकून ती मूर्च्छित होऊन जमिनीवर कोसळली. तिला आपल्या देहाचे व नेसलेल्या वस्त्राचे भान राहिले नाही. शोकाने पीडित होऊन 'दोन्ही पुत्र मरण पावले, पती रस्त्यात मरण पावला, आईवडील व भाऊ एकाच चित्तेवर जाळले गेले' असा विलाप करीत ती इकडे तिकडे भटकू लागली. अंगावरील वस्त्र पडल्याकारणाने आणि लज्जा आदी कोणतीही भावना तिला न राहिल्याने तिचे नाव 'पटाचारा' (आचारापासून च्युत झालेली) असे पडले. 'हे वेडे पळ' असे म्हणून काही लोक तिच्या डोक्यावर कचरा फेकत, काही तिच्या अंगावर धूळ टाकत, तर काही तिच्यावर चिखलफेक करीत असत. भगवान बुद्ध मोठ्या परिषदेमध्ये बसून धम्मोपदेश करीत होते. त्यांनी तिला त्या अवस्थेत पाहिले. ती सुद्धा बिहाराच्या दिशेने येऊ लागली. विहारातील लोकांनी तिला पाहून 'ह्या वेडीला येथे येऊ देऊ नका' असे म्हटले. तेव्हा भगवंत म्हणाले, 'तिला अडवू नका इकडे येऊ द्या.' जेव्हा ती भगवंताच्या जवळ आली तेव्हा भगवंत तिला म्हणाले, 'भगिनी! भानावर ये आपली स्मृती प्राप्त कर.' भगवंताच्या कृपेने ती भानावर आली. तिची पूर्वीची स्मृती जागृत झाली. आपल्या अंगावर वस्त्र नसून आपण नग्न आहोत हे तिच्या लक्षात आले व ती लज्जेने खाली बसली. एकाने तिच्या अंगावर वस्त्र फेकले. ते वस्त्र ती नेसली. शास्त्याजवळ जाऊन ती त्यांच्या पायावर पडली व म्हणाली, 'भन्ते! माझे रक्षण करा. माझ्या एका मुलाला ससाण्याने मारले, एक प्रवाहात वाहून मरण पावला, रस्त्यात पती मरण पावला, आई-वडील आणि भाऊ एकाच चितेवर जाळले गेले. भन्ते माझे रक्षण करा.' भगवंतांनी ही तिची करुण व शोकपूर्ण कहाणी ऐकून म्हटले, 'पटाचारे, चिंता करू नकोस. तुझी स्वतःची रक्षा करण्यास समर्थ असणाऱ्याकडे तू आली आहेस' भगवंतांनी तिला उपदेश दिला. त्यामुळे तिच्या मनाला शांती मिळाली. ज्याप्रमाणे तू पुत्रादींच्या मरणामुळे अश्रू ढाळत आहेस त्याप्रमाणे अनादि असलेल्या या संसारात (प्रिय जनांच्या) मरणामुळे ढाळलेले अश्रू चार महासमुद्रातील पाण्यापेक्षा जास्त आहेत. अशाप्रकारे उपदेश दिल्यावर तिचा शोक कमी झाला. भगवंत पुढे म्हणाले, 'पटाचारे! तुझे पुत्र आदी तुझे शरणस्थान होऊ शकत नाहीत. तेव्हा तू आपले शील शुद्ध कर. निब्बाणगामी मार्गाची पथिक हो. तेच तुझ्याकरिता उत्तम शरण-स्थान आहे.' हा उपदेश ऐकल्यावर पटाचारेला स्रोतापती फळ प्राप्त झाले. भिक्खुणींच्या जवळ जाऊन ती साधना करू लागली. एके दिवशी भांड्यात पाणी घेऊन ती पाय धुवू लागली. पाय धुतल्यावर उरलेले पाणी पायावर ओतले. ते पाणी थोड्या दूर जाऊन जमिनीत मुरले. त्यानंतर दुसऱ्यांदा पायावर पाणी ओतले. ते त्याच्यापेक्षा थोडे दूर जाऊन जमिनीत मुरले. त्यानंतर तिसऱ्यांदा पाणी ओतले ते त्याहीपेक्षा थोडे दूर जाऊन जमिनीत मुरले. हे दृश्य पाहून पटाचारा विचार करू लागली. 'मी पहिल्यांदा ओतलेल्या पाण्याप्रमाणे काही प्राणी पहिल्या वयात मरण पावतात, दुसऱ्यांदा ओतलेल्या व त्याच्यापेक्षा दूर गेलेल्या पाण्याप्रमाणे काही मध्यम वयात आणि तिसऱ्यांदा ओतलेल्या व त्याच्याहीपेक्षा दूर गेलेल्या पाण्याप्रमाणे काही शेवटच्या वयात मरण पावतात.' हे पाहून भगवान बुद्ध जणू काही तिच्यापुढे उभे राहून उपदेश करू लागले, 'पटाचारे! हे सर्व प्राणी मरणधर्मी आहेत.' उपदेशाच्या शेवटी पटाचारेला निब्बाणपदाचा साक्षात्कार झाला. त्यानंतर आपल्या जीवनाचे प्रत्यवेक्षण करतांना ती म्हणते :-

**नांगरांनी शेत कसून माणसे जमिनीत बी पेरतात.**
**स्त्री-पुत्रादींचे पालन-पोषण करून धन मिळवितात. ॥११२॥**

**मी निरलस, अचंचल, शीलसम्पन्न, शास्त्याच्या उपदेशाप्रमाणे**
**आचरण करणारी असून मी निब्बाण प्राप्त कां**
**करीत नाही ? ॥११३॥**

**(एके दिवशी) पाय धुवून मी पायावर पाणी ओतले ते**

पायावर ओतलेले पाणी उंच भागाकडून सखल भागाकडे (वाहत) आलेले पाहून जातिवंत घोड्याप्रमाणे मी माझे चित्त समाधीत गुंतवले. ॥११४॥

त्यानंतर दिवा घेऊन मी विहारात प्रवेश केला. बिछाना अवलोकन करीत खाटेवर बसले. ॥११५॥

त्यानंतर खिट्टी घेऊन मी दिव्याची वात खाली तेलात ओढली. (त्यामुळे) दिवा विझला. विझलेल्या दिव्याप्रमाणे (माझे) चित्त विमुक्त झाले. ॥११६॥

## ४८. पटाचारेच्या शिष्या—तीस भिक्खुणी

वेगवेगळ्या ठिकाणी या तीस भिक्खुणींचा जन्म झाला होता. ह्या सर्वांनी पटाचारा थेरीचा धम्मोपदेश ऐकून त्यांना धम्माप्रती श्रद्धा उत्पन्न झाली होती. त्यामुळे त्या संघात प्रविष्ट झाल्या. दिव्यज्ञानासाठी प्रयत्न करीत असतांना त्यांनी थोड्याच अवधीत त्याचा साक्षात्कार करून घेतला. आपल्या अनुभवाचे वर्णन करतांना त्या म्हणतात :-

"मुसळ घेऊन मानव धान्य कांडतात. स्त्री-पुत्रादींचे पालन-पोषण करणारे मानव धन मिळवितात. ॥११७॥

जे करून पश्चात्ताप करावा लागत नाही त्या बुद्धशासनाचे आचरण करा. ताबडतोब पाय धुवून एका बाजूला बसा. चित्त समाधियुक्त करून बुद्धशासनाचे आचरण करा. ॥११८॥

पटाचारेच्या उपदेशाचे ते वचन ऐकून व पाय धुवून आम्ही एका बाजूला बसलो. चित्त समाधियुक्त करून बुद्धशासनाचे आचरण केले. ॥११९॥

रात्रीच्या पहिल्या प्रहरात आम्हाला पूर्वजन्माचे स्मरण झाले. रात्रीच्या मधल्या प्रहरात आम्ही दिव्यचक्षु विशोधित केला व रात्रीच्या शेवटच्या प्रहरात अन्धकार नष्ट केला. ॥१२०॥

(समाधीतून) उठून आम्ही (पटाचारेच्या) पायांना वंदन केले व म्हटले, 'तुझ्या उपदेशाप्रमाणे आचरण केले. संग्रामात विजय-प्राप्त इंद्राची तीस देवता पूजा करतात त्याप्रमाणे आम्ही तीसही आपली पूजा करू (कारण आपल्या उपदेशामुळेच) आम्ही तीन विद्या जाणणाऱ्या

**आणि अनाश्रव (चित्तमलरहित) झालेल्या आहोत.॥१२१॥**

**४९. चन्दा**

एका ब्राह्मणगावात ब्राह्मण कुळात जन्म झाला होता. चन्दा जन्मल्यापासून कुटुंब दरिद्री झाले. त्यामुळे ती दारिद्र्यातच वाढली. थोडी मोठी झाल्यावर तिच्या घरी भयंकर असा साथीचा रोग उत्पन्न होऊन कुटुंबातील एक एक माणूस मरू लागला. अशाप्रकारे साथीच्या रोगाने सर्व नातलगांचा बळी पडल्यावर उपजीविकेचे दुसरे काही साधन नसल्यामुळे ती हातात भिक्षापात्र घेऊन भिक्षा मागू लागली व त्या अन्नाने आपला उदरनिर्वाह करू लागली. एके दिवशी ती पटाचारा भिक्खुणीकडे आली. त्यावेळी पटाचारेचे जेवण संपले होते, तरीसुद्धा तिने उपाशी असलेल्या चन्देच्या जेवणाची व्यवस्था केली. पटाचारा आणि अन्य भिक्खुणींचा अत्यंत सहानुभूतीपूर्ण व्यवहार पाहून चन्दा प्रसन्न झाली. तिने पटाचारेचा उपदेश ऐकला व तिच्याचबरोबर राहू लागली. काही दिवसांनी प्रव्रजित झाली. दिव्यज्ञानाच्या प्राप्तीसाठी खूप परिश्रम घेतले. शेवटी अर्हत्पदाचा साक्षात्कार केला. आपल्या पूर्वजीवनाचे प्रत्यवेक्षण करतांना ती म्हणते :-

**पूर्वी मी दरिद्री, विधवा व संतानरहित होते. मला मित्र**
**न नातलग (कोणीच) नसल्यामुळे अन्न-वस्त्र मिळत नसे. ॥१२२॥**

**(हातात) भिक्षापात्र आणि काठी घेऊन घरोघरी भिक्षा**
**मागत थंडी व उन्हाने व्याकुळ होऊन मी सात वर्षे भटकत**
**राहिले.॥१२३॥**

**एके दिवशी अन्नपाणी (सहजपणे) मिळणाऱ्या एका**
**भिक्खुणीला पाहून, तिच्या जवळ जाऊन, बेघर करणारी**
**प्रव्रज्या द्या असे म्हणाले.॥१२४॥**

**आणि त्या पटाचारेने माझ्यावर अनुकम्पा करून मला**
**प्रव्रज्या दिली. त्यानंतर उपदेश देऊन परमार्थाला लावले. ॥१२५॥**

**तिचे ते वचन ऐकून मी बुद्धशासनाप्रमाणे आचरण केले.**
**आर्येचा उपदेश सफल झाला कारण मी त्रैविद्य व अनाश्रव**
**(चित्तमलरहित) झाले आहे. ॥१२६॥**

## सहावा वर्ग
## सहावा निपात

### ५०. पटाचारेच्या शिष्या-पाचशे भिक्खुणी

वेगवेगळ्या ठिकाणी या भिक्खुणींचा जन्म झालेला होता. वयात आल्यावर या सर्वांचे विवाह झाले. सर्व आपापल्या पतीच्या घरी राहत होत्या. सर्वांनाच पुत्र-संततीचा लाभ झाला. परंतु सर्वांनाच पुत्रसंततीचा वियोग सहन करावा लागला. एके दिवशी त्या पटाचारा थेरीजवळ आल्या व आपल्या दुःखाचे कारण सांगितले. त्यांचे म्हणणे ऐकून पटाचारेने त्यांना उपदेश दिला. पटाचारेच्या उपदेशाचा त्यांच्यावर परिणाम होऊन त्या सर्व भिक्खुणी-संघात प्रविष्ट झाल्या. ध्यानभावना केल्यावर सर्वांना दिव्यज्ञान प्राप्त झाले. ते अनुभव त्यांनी खालील शब्दात सांगितले :-

**कोणत्या मार्गाने आला व कोणत्या मार्गाने गेला असा**
**ज्याचा मार्ग तू जाणत नाहीस, अशा कोठून तरी आलेल्या**
**प्राण्याविषयी 'माझा पुत्र आहे' असे म्हणून रडतेस ? ॥१२७॥**

**कोणत्या मार्गाने आला व कोणत्या मार्गाने गेला हा मार्ग**
**जरी तू जाणत असशील तरी त्यासंबंधी शोक करणे योग्य**
**नाही; कारण प्राणी याच गुणधर्माचे आहेत. ॥१२८॥**

**कोणी विनंती केली नसतांना परठिकाणाहून आला व**
**परवानगी न घेताच येथून निघून गेला. (अशाप्रकारे)**
**कोठून तरी येऊन काही दिवस राहिला. ॥१२९॥**

**येथून सुद्धा दुसऱ्या मार्गाने गेला, तेथून सुद्धा दुसऱ्या**
**मार्गाने जातो, तेथून गेलेला प्राणी व्यक्तिरूप घेऊन भटकून**
**निघून जातो. ज्याप्रमाणे आला त्याप्रमाणे गेला याबाबतीत**
**कशाकरिता रडावे ? ॥१३०॥**

**हृदयाला टोचलेला दुर्दर्श असा बाण काढून टाकला. शोकाने**
**दुःखी झालेल्या माझा पुत्र-शोक नष्ट केला. ॥१३१॥**

**ती आज मी शल्यरहित, तृष्णारहित व परमशांत झाले**
**आहे. मी बुद्ध, धम्म आणि संघाला शरण जाते. ॥१३२॥**

अनुक्रमणिका

## ५१. वासेट्ठी

वैशालीतील एका प्रतिष्ठित कुटुंबात वासेट्ठीचा जन्म झाला. वयात आल्यावर कुलीन तरुणाशी हिचा विवाह झाला. वैवाहिक जीवन सुखाने घालवीत असताना सुंदर पुत्राला जन्म दिला. परंतु मुलगा जास्त दिवस जगला नाही. अगदी लहान वयात मरण पावला. पुत्राच्या शोकाने ती वेडी झाली. नवरा व इतर नातलगांनी समजाविण्याचा खूप प्रयत्न केला. तिच्यावर उपचार केले. परंतु एके दिवशी ती घरातून पळून गेली. ठिकठिकाणी भटकत भटकत ती मिथिला नगरीत आली. त्यावेळी भगवान बुद्ध मिथिला नगरीत विहार करीत होते. वासेट्ठी रस्त्यात भटकत असतांना तिने इंद्रियांचे दमन केलेल्या व शांत असलेल्या भगवान बुद्धाला रस्त्याने चालतांना पाहिले. त्यांच्या व्यक्तित्वाचा वासेट्ठीवर परिणाम होऊन ती पूर्व स्थितीत आली. तेव्हा भगवंतांनी तिला संक्षिप्त धम्मोपदेश दिला. संघात प्रवेश मिळण्यासाठी वासेट्ठीने भगवंतांची याचना केली. ती प्रव्रजित झाली. परिश्रमपूर्वक साधना करीत वासेट्ठीने अल्पावधीत दिव्यज्ञानाचा लाभ करून घेतला. आपला अनुभव कथन करतांना ती गाते :-

**पुत्र-शोकाने पीडित, विक्षिप्त चित्त, विमनस्क, नग्न आणि**
**केस अस्ताव्यस्त झालेली मी इकडे तिकडे भटकत होते. ॥१३३॥**

**कधी रस्त्यात, कधी कचऱ्याच्या ढिगावर, कधी स्मशानात,**
**तर कधी राजमार्गावर भूक व तहानेने व्याकुळ होऊन मी**
**तीन वर्षे भटकत होते. ॥१३४॥**
**नंतर मिथिला नगरीत रस्त्याने जात असलेल्या, दमन न**
**झालेल्यांचे दमन करणाऱ्या, निर्भय व सम्बुद्ध अशा**
**भगवान सुगताला पाहिले. ॥१३५॥**

**चित्ताची मूळ प्रकृति प्राप्त होऊन व वन्दन करून मी**
**त्यांच्याजवळ बसले. त्या भगवान गौतमाने माझ्यावर**
**अनुकम्पा करून धम्माचा उपदेश केला. ॥१३६॥**

**त्यांचा धम्म ऐकून मी बेघर होऊन प्रव्रजित झाले.**
**शास्त्याच्या वचनाप्रमाणे प्रयत्न करीत मी मंगलमयपदाचा**
**(निब्बाणाचा) साक्षात्कार केला. ॥१३७॥**

**माझे सर्व शोक नष्ट झाले. (ह्या अर्हत्त्वामध्येच) त्यांचा**
**अंत असल्याकारणाने ते सर्व सुटले. कारण जेथून शोक**
**उत्पन्न होतो ते मूळ स्थानच मी जाणले आहे. ॥१३८॥**

## ५२. खेमा

मगध देशातील सागल नगरीमध्ये राजकुळात खेमाचा जन्म झाला होता. ती अतिशय सुंदर होती. मगधराज बिम्बिसार याच्याशी हिचा विवाह झाला होता. एके दिवशी भगवान बुद्ध वेळुवनात आले असतांना संपूर्ण

राजपरिवार त्यांच्या दर्शनाकरिता गेला होता. परंतु स्वतःच्या सौंदर्याचा गर्व वाटत असल्यामुळे व भगवान बुद्ध शरीरातील दोष दाखवीत असल्याकारणाने ती दर्शनाकरिता गेली नाही. तथापि वेळुवन पाहण्याच्या निमित्ताने राजाने तिचे मन वळविले. राणीने संपूर्ण दिवस वेळुवनात घालविला. परंतु भगवान बुद्धाचे दर्शन न घेताच ती परत जाऊ लागली. तेव्हा तिची इच्छा नसतांनाही राजकर्मचाऱ्यांनी तिला भगवंतांच्या दर्शनाकरिता नेले. शास्त्याने तिचा गर्व हरण करण्यासाठी आपल्या ऋद्धिसामर्थ्याने एक अप्सरा तयार केली. अप्सरा भगवंतांवर पंख्याने वारा घालीत होती. तिला पाहून खेमा विचार करू लागली, 'अशा प्रकारच्या अप्सरा भगवंताच्या जवळ असतात, मी त्यांची दासी होण्याच्या सुद्धा लायकीची नाही.' त्या अप्सरेकडे पाहात ती उभी राहिली. ती अप्सरा प्रथम तारुण्यावस्थेत, त्यानंतर मध्यम वयात आणि शेवटी म्हातार वयाची तिला दिसू लागली. म्हातार वयात ती दात पडलेली, केस पांढरे झालेली, शरीरावर सुरकुत्या पडलेली अशी दिसू लागली. शेवटी ती पंख्यासह जमिनीवर कोसळली. खेमाने हे दृश्य पाहून विचार केला, 'अशाप्रकारे हे शरीर विपत्ती प्राप्त झाले. माझ्या शरीराची सुद्धा अशाच प्रकारे दुर्गती होईल.' 'भगवंतांनी तिचा हा विचार जाणून तिला धम्मोपदेश केला. उपदेश संपल्याबरोबर तिला दिव्यज्ञानाचा लाभ झाला. त्यानंतर ती प्रव्रजित झाली. भिक्खुणी संघातील प्रज्ञावान भिक्खुणींमध्ये ती सर्वश्रेष्ठ समजली जात होती. एके दिवशी खेमा झाडाखाली बसून ध्यानभावना करीत होती. त्यावेळी मार एका तरुणाच्या रूपात तिच्याकडे येऊन तिला मोहित करू लागला, त्याप्रसंगी दोघांचा झालेला संवाद व खेमाने मारावर कसा विजय मिळविला याचा अनुभव ती खालील शब्दात मांडते :-

**"खेमे! तू रुपवती तरुणी आहेस, मी सुद्धा तरुण युवक**
**आहे. चल, आपण पाच प्रकारच्या संगीताच्या तालावर**
**विषयसुखात रममाण होऊ." ॥१३९॥**

**"या दुर्गन्धयुक्त, व्याधियुक्त, क्षणभंगुर शरीराविषयी**
**घृणा उत्पन्न होते व लाज वाटते. कारण मी कामतृष्णा**
**मुळासकट उपटून टाकली आहे." ॥१४०॥**

**शरीराला विद्ध करणाऱ्या भाल्याच्या टोकाप्रमाणे कामतृष्णा**
**आहेत. त्यांच्यामुळे स्कन्धमय (प्राण्यांचा) नाश**
**होतो. ज्याला तू कामसुख म्हणतोस त्याबाबतीत आता**
**मला अनासक्ती आहे. ॥१४१॥**

**माझी तृष्णा सर्व ठिकाणातून नष्ट झाली आहे. माझा**
**अज्ञानान्धकार सुद्धा नष्ट झाला आहे. हे प्राण्यांचा नाश**
**करणाऱ्या पापी मारा! अशाप्रकारे तू जाणून घे. आज**
**तुझाच नाश झालेला आहे. ॥१४२॥**

**तुझे स्वरूप यथार्थपणे न जाणणारे मूर्ख नक्षत्रांना नमस्कार**
**करतात, तसेच वनात अग्नीची उपासना करतात व त्यातच**
**शुद्धी आहे असे समजतात. ॥१४३॥**

**मी मात्र उत्तम पुरुष अशा सम्बुद्धाला नमस्कार करून व शास्त्याच्या शासनाप्रमाणे आचरण करून सर्व दुःखापासून विमुक्त झाले आहे." ॥१४४॥**

### ५३. सुजाता

साकेत नगरीमध्ये व्यापाऱ्याच्या कुळात हिचा जन्म झाला होता. एका व्यापाऱ्याच्या मुलाबरोबर सुजाताचा विवाह झाला होता. वैवाहिक जीवन आनंदात जात होते. एके दिवशी ती उद्यानात गेली. दिवसभर उद्यानात राहून घरी परत येतांना अंजनवनात शास्त्याचे दर्शन झाले. त्यांच्या दर्शनाने चित्त प्रसन्न झाल्यामुळे ती त्यांच्याजवळ जाऊन व वंदन करून एका बाजूला बसली. शास्त्याने तिला धम्मोपदेश केला. तेथेच तिला दिव्यज्ञानाचा साक्षात्कार झाला. तेथून ती घरी परतली. पतीची व आई-वडिलांची परवानगी मागून भिक्खुणींच्या जवळ प्रव्रजित झाली. आपला अनुभव सांगतांना ती म्हणते :-

**अलंकृत, सुंदर वस्त्र परिधान करून, माळा घालून, शरीराला चंदनाचा लेप लावून, सर्व दागदागिने अंगावर घालून, पुष्कळ अन्नपाणी, खाद्यपदार्थ व भोजन घेऊन दासींसह घराबाहेर पडून उद्यानात गेले. ॥१४५-१४६॥**

**तेथे क्रीडा करून व रममाण होऊन स्वतःच्या घरी परत येतांना एक विहार पाहिला. आणि साकेतातील त्या अंजनवनात प्रवेश केला. ॥१४७॥**

**तेथे लोक-प्रद्योत भगवान बुद्धाला पाहून, वंदन करून त्यांच्याजवळ बसले. त्या चक्षुमान सम्बुद्धाने माझ्यावर अनुकंपा करून मला धम्मोपदेश केला. ॥१४८॥**

**महर्षीचा उपदेश ऐकून मी सत्याचा साक्षात्कार केला. तेथेच मी विमल धम्म असे अमृत-पद (निब्बाण) प्राप्त केले. ॥१४९॥**

**त्यानंतर सद्धम्माचे ज्ञान झाल्यावर मी बेघर करणारी प्रव्रज्या घेतली. तीन विद्या प्राप्त केल्या (त्यामुळे) बुद्धशासन सफल झाले आहे. ॥१५०॥**

### ५४. अनोपमा

साकेत नगरीतील मध्य [सिंहल लिपीतील टीकेप्रमाणे हे नाव 'मेघ' आहे.] नावाच्या व्यापाऱ्याच्या घरी हिचा जन्म झाला होता. अद्वितीय रूप-सौंदर्यामुळे तिचे 'अनोपमा' असे नाव ठेवण्यात आले होते. विवाहाचे वय झाल्यावर अनेक व्यापाऱ्यांच्या मुलांनी, राजमंत्र्यांनी आणि राजांनी तिच्या वडिलाकडे दूत पाठविले, 'आपली मुलगी

अनोपमा द्या, आम्ही तुम्हाला अमुक अमुक देऊ.' हे वारंवार ऐकून तिचे चित्त अगोदरच उच्च ध्येयाकडे लागले असल्यामुळे सांसारिक जीवनाबद्दल ती उदासीन झाली. तिने वडिलांना सांगून टाकले, 'मला सांसारिक जीवनाचे प्रयोजन नाही.' शास्त्याकडे जाऊन तिने धम्म ऐकला आणि (एका) भिक्खुणीजवळ जाऊन प्रव्रज्या घेतली. परिश्रमपूर्वक साधना करीत तिने सातव्या दिवशी अर्हत्पद प्राप्त केले. त्या आनंदाच्या भरात तिच्या तोंडून खालील उद्‌गार निघाले :-

**पुष्कळ संपत्ती असलेल्या व महाधनवान अशा उच्च कुळात**
**मी जन्मले. रंगरूपसंपन्न मी 'मध्याची' (तिच्या वडिलाचे**
**नाव) कन्या आहे. ॥१५१॥**

**(मोठमोठ्या) राजपुत्रांनी आणि व्यापाऱ्यांच्या मुलांनी**
**(माझ्याशी विवाह करण्याकरिता) प्रार्थना केली. उत्कट**
**अभिलाषा दाखविली. 'आम्हाला अनोपमा द्या' (असा**
**संदेश घेऊन) माझ्या वडिलांकडे दूत पाठविले. ॥१५२॥**

**'तुझी मुलगी अनोपमा हिचे जेवढे वजन होईल त्यापेक्षा**
**आठपट सोने व रत्ने देऊ.' ॥१५३॥**

**परंतु मी लोकात जेष्ठ व श्रेष्ठ अशा सम्बुद्धाला पाहून**
**त्यांच्या पायांना वंदन करून एका बाजूला बसले. ॥१५४॥**

**त्या भगवान गौतमाने माझ्यावर अनुकम्पा करून मला**
**धम्म दिला. त्याच आसनावर बसून मी तिसरे फळ**
**(अनागामी-फळ) प्राप्त केले. ॥१५५॥**

**त्यानंतर केस कापून बेघर करणारी प्रव्रज्या घेतली. तृष्णा**
**नष्ट झाल्यापासून आज ही माझी सातवी रात्र आहे.॥१५६॥**

## ५५. महापजापती गोतमी

देवदह नगरीतील महासुप्रबुद्धाची ही मुलगी होय. 'गोतमी' हे नाव गोत्रामुळे पडले. भगवान बुद्धाची आई महामायादेवीची ही सर्वांत धाकटी बहीण. दोघींचाही विवाह शुद्धोदन राजाशी झाला होता. सिद्धार्थाचा जन्म झाल्यावर सातव्या दिवशी महामायादेवीचा देहान्त झाला. तेव्हा महापजापती गोतमीनेच त्याचे पालन-पोषण केले. शुद्धोदन महाराजांच्या मृत्यूनंतर महापजापती गोतमीने संसार त्याग करण्याची इच्छा प्रगट केली. सुरुवातीला या गोष्टीला भगवान बुद्धाने परवानगी दिली नाही म्हणून दुसऱ्यांदा केस कापून काषाय वस्त्र परिधान करून शाक्यकुमारांच्या पाचशे पत्नींना घेऊन ती वैशालीमध्ये आनंद थेराकडे आली. आनंद थेराच्या रदबदलीमुळे भगवान तथागताने त्यांना प्रव्रज्या व उपसम्पदा घेण्याची अनुमती दिली. त्यानंतर भिक्खुणींचा एक स्वतंत्र संघ स्थापन झाला. महापजापती गोतमी उच्च कोटीतील साधिका होती. बुद्धाप्रती तिची अगाढ

श्रद्धा होती. त्यानी बहुजन कल्याणासाठी कशाप्रकारे जन्म घेतला, त्याचे सुंदर वर्णन तिने खालील शब्दात मांडले :-

**हे बुद्धा! हे वीरा! सर्व प्राण्यांमध्ये उत्तम! ज्याने मला
आणि इतर पुष्कळ लोकांना दुःखापासून मुक्त केले, त्या
तुला नमस्कार असो. ॥१५७॥**

**मी सर्व दुःख जाणले. त्याचे कारण असलेली तृष्णा मी
नष्ट केली. दुःखनाशाचा जो आर्य अष्टांगिक मार्ग आहे
त्याची मी भावना केली व (दुःख) निरोध (निब्बाण)
मी मिळविला आहे. ॥१५८॥**

**मी पूर्वी कोणाची आई, पुत्र, पिता, आजी होते. यथार्थपणे
न जाणल्यामुळे मी (संसार-सागरात कोठेही ठाव न
गवसता) फिरत राहिले. ॥१५९॥**

**(या जन्मात) मी त्या भगवंतांना पाहिले. हे माझे अंतिम
शरीर आहे. (असा मला अनुभव आला) माझे आवागमन
संपले. आता मला पुनर्जन्म नाही.॥१६०॥**

**उद्योगी, दृढनिश्चयी, नित्य दृढ पराक्रम करणाऱ्या
आणि एकत्र आलेल्या श्रोतृजनांनो पहा, हे बुद्धांना केलेले
वन्दन आहे. ॥१६१॥**

**अरे! पुष्कळांच्या कल्याणाकरिता महामायेने गौतमाला
जन्म दिला. त्याने व्याधी-मरण-ग्रस्त प्राण्यांचा दुःखसमूह
नष्ट केला. ॥१६२॥**

## ५६. गुत्ता

श्रावस्तीमध्ये ब्राह्मण कुळात जन्म झाला होता. सांसारिक जीवनाविषयी उदासीन असल्यामुळे आई-वडीलांची परवानगी घेऊन गुत्ता प्रव्रजित झाली. महापजापती गोतमीच्या जवळ राहून ध्यानसाधना केली. तरीसुद्धा चित्त बाह्य वस्तूंकडे धाव घेत होते. एकाग्र होत नव्हते. हे पाहून शास्त्याने तिच्यावर अनुकम्पा करून धम्मोपदेश केला. धम्मोपदेश संपल्यावर तिला दिव्यत्वाचा साक्षात्कार झाला. शास्त्याच्या प्रेरणेचा अनुभव ती खालील शब्दात मांडते :-

**गुत्ते! पुत्र व प्रिय संपत्ती ह्यांचा त्याग करून ज्या
उद्देशाने प्रव्रज्या घेतलीस, त्याचीच पक्की खूणगाठ बांध.
चित्ताच्या ताब्यात जाऊ नकोस. ॥१६३॥**

**चित्ताने फसविले गेलेले लोक माराच्या विषयात रत असतात व ते मूर्ख अनेक वेळा जन्म-मरणाच्या चक्रात धावतात. ॥१६४॥**

**काम-तृष्णा, द्वेष, सत्काय दृष्टी (आत्मवादी ज्ञान), शील-व्रत परामर्श (कर्मकांड करण्याची इच्छा) आणि शंका-कुशंका ही पाच बंधने, जी खालच्या सत्त्वलोकात जन्म देणारी आहेत, ती नष्ट करून, हे भिक्खुणी, तू पुन्हा संसारात येणार नाहीस. ॥१६५-१६६॥**

**राग, मान, अविद्या, मानसिक चंचलता दूर करून, ही बंधने नष्ट करून तू दुःखाचा शेवट करशील. ॥१६७॥**

**आवागमन दूर फेकून, पुनर्जन्म जाणून याच जीवनात तृष्णारहित व परमशांत होऊन विचरण करशील. ॥१६८॥**

## ५७. विजया

राजगृह नगरीत एका प्रतिष्ठित कुटुंबात विजयाचा जन्म झाला होता. भिक्खुणी खेमाची ही मैत्रीण होती. खेमा प्रव्रजित झाल्याचे ऐकून ती तिच्याकडे गेली. विजयाची भावना ओळखून खेमा थेरीने तिला उपदेश केला. उपदेश ऐकल्यावर विजयाला धम्माप्रती श्रद्धा वाटू लागली. तिने प्रव्रज्येची याचना केली. तेव्हा भिक्खुणी खेमाने तिला प्रव्रज्या दिली. ध्यानसाधना करीत विजयाने अर्हत्‌पद प्राप्त केले. तो अनुभव विशद करताना ती म्हणते :-

**चित्त ताब्यात नसल्यामुळे चित्ताची शांती लाभली नाही. त्यामुळे मी चार-पाचदा विहारातून बाहेर आले. ॥१६९॥**

**(नंतर) (एका) भिख्खुणीकडे जाऊन मी नम्रपणे विचारले तिने मला धातू, आयतन, चार आर्य सत्ये, इंद्रिये, बल, बोधि-अंगे आणि उत्तम ध्येय (निब्बाण) प्राप्तीसाठी अष्टांगिक मार्ग या धम्माचा उपदेश केला. ॥१७०-१७१॥**

**तिचे वचन ऐकून मी त्याप्रमाणे आचरण केले. रात्रीच्या पहिल्या प्रहरात मला पूर्वजन्माचे स्मरण झाले. ॥१७२॥**

**रात्रीच्या मधल्या प्रहरात दिव्यचक्षु विशोधित केला व रात्रीच्या शेवटच्या प्रहरात अंधकार नष्ट केला. ॥१७३॥**

**प्रीती व सुख ह्यांनी हा देह प्रफुल्लित करीत मी विहार**

केला. अंधकार नष्ट करूनच मी सातव्या रात्री पाय पसरले (समाधी-आसनाचा भंग केला). ॥१७४॥

अनुक्रमणिका

## सातवा वर्ग
## सातवा निपात

### ५८. उत्तरा

श्रावस्तीमधील एका प्रतिष्ठित कुटुंबात जन्म झाला होता. एके दिवशी विचार करून उत्तरा पटाचारा थेरीकडे गेली. तिने धम्मोपदेश केला. धम्म ऐकल्यामुळे संसारातून मन विरक्त झाले. दिवसेंदिवस धम्माप्रती श्रद्धा वाढू लागली. त्यामुळे प्रव्रज्येकरिता याचना केली. पटाचारा थेरीनेच प्रव्रज्या दिली. तिच्याच जवळ साधना करीत अर्हत्पद प्राप्त केले. पटाचारा थेरीविषयी आपली कृतज्ञता दाखवितांना आणि आपला अनुभव सांगतांना ती म्हणते :-

**मुसळ घेऊन माणसे धान्य कांडतात. स्त्री-पुत्रादींचे पालनपोषण**
**करीत धन मिळवितात. ॥१७५॥**

**जे करून पश्चात्ताप करावा लागत नाही, अशा बुद्ध**
**शासनाचे बाबतीत प्रयत्नशील राहा. (त्याकरिता)**
**ताबडतोब पाय धुवून एका बाजूला बसा. ॥१७६॥**

**चित्त एकाग्र करून चांगल्या प्रकारे समाधिस्थ व्हा. (आणि**
**नंतर) सर्व संस्कार आपले नव्हंत, त्यात आत्मीयता नाही**
**असे प्रत्यवेक्षण करा. ॥१७७॥**

**त्या पटाचारेच्या उपदेशाचे वचन ऐकून मी पाय धुवून**
**एका बाजूला बसले. ॥१७८॥**

**रात्रीच्या पहिल्या प्रहरात पूर्वजन्माचे स्मरण झाले.**
**रात्रीच्या मधल्या प्रहरात दिव्यचक्षु विशोधित केला.**
**रात्रीच्या शेवटच्या प्रहरात अंधकार नष्ट केला. तुझ्या**
**उपदेशाप्रमाणे आचरण केल्यामुळे त्रैविद्य (तीन विद्या**
**जाणणारी) म्हणूनच मी आसनावरून उठले. ॥१७९-१८०॥**

**संग्रामात विजय प्राप्त झालेल्या इंद्राची तीस देवता पूजा**
**करतात, त्याप्रमाणे मी आपली पूजा करीन (कारण**
**आपल्या उपदेशामुळे) मी तीन विद्या जाणणारी आणि**
**अनाश्रव (चित्तमलरहित) अशी झाले आहे. ॥१८१॥**

## ५९. चाला

मगध देशातील नालक नावाच्या गावात एका ब्राह्मण कुटुंबात हिचा जन्म झाला होता. तिच्या आईचे नाव सुरूपसारी असे होते. नामकरण संस्काराच्या दिवशी तिचे नाव 'चाला' असे ठेवण्यात आले. तिच्यापेक्षा लहान बहिणीचे 'उपचाला' आणि तिच्याहीपेक्षा लहान असलेल्या बहिणीचे 'सीसूपचाला' असे नाव होते. ह्या तिघीही जणी धम्मसेनापती सारिपुत्ताच्या बहिणी होत्या. त्या सारिपुत्तापेक्षा लहान होत्या. धम्मसेनापती सारिपुत्ताने प्रव्रज्या घेतल्याचे ऐकून ह्या तिघीही विचार करू लागल्या– 'त्याचा धम्म व विनय असामान्य असावा, त्याची प्रव्रज्या असामान्य असावी. त्यामुळेच आपल्या भावाने श्रद्धापूर्वक दीक्षा घेतली.' या विचाराने प्रेरित होऊन या तिघीही बहिणी प्रव्रजित झाल्या. प्रव्रजित झाल्यावर दीर्घोद्योग व कठोर साधना करीत त्यांनी अर्हत्पदाचा साक्षात्कार केला व दिव्यसुखाचा अनुभव घेत त्या राहू लागल्या. एके दिवशी भिक्खुणी चाला अन्धवनात जाऊन दिवसाच्या समाधी-भावनेसाठी बसली. तेथे माराने तिला ब्रह्मचर्य मार्गापासून विचलित करण्याकरिता वाद सुरू केला. चालाने बुद्ध आणि त्यांचा धम्म यांचे वर्णन करून आपल्याला कोणती अवस्था प्राप्त झाली याचे सुस्पष्ट चित्र मारापुढे उभे केले. ते सर्व ऐकून मार दुःखी व पराजित होऊन निघून गेला. हा अनुभव तिने पुढील शब्दांत मांडला आहे:-

**भिक्खुणी चालाने स्मृती जागृत ठेऊन, इंद्रियांची भावना**
**करून (इंद्रियांचे दमन करून) संस्कार जेथे नष्ट होतात**
**असे शांत सुखदायक पद प्राप्त केले. ॥१८२॥**

मार–

**कोणत्या (धर्ममताच्या गुरूला) उद्देशून तू मुण्डन केले**
**आहेस व भिक्खुणीप्रमाणे दिसतेस! निरनिराळे मतवाले**
**पाखंडीही तुला आवडत नाहीत. तू मोहाचे आचरण कां**
**करीत आहेस ? ॥१८३॥**

चाला–

**(मिथ्या) दृष्टीचा आश्रय करणारे, (बौद्ध धम्माच्या)**
**बाहेर मतमतांतरे धारण करणारे पाखंडी आहेत. ते धम्म**
**जाणत नाहीत, तसेच ते धम्मतत्त्वाचे कोविदसुद्धा नाहीत. ॥१८४॥**

**परंतु अद्वितीय भगवान बुद्ध शाक्य कुळात जन्माला आले**
**आहेत. (मिथ्या) दृष्टीचे उल्लंघन ज्यात होते अशा**
**धम्माचा (त्यांनी) मला उपदेश केला. ॥१८५॥**

**दुःख, दुःखाची उत्पत्ती, दुःखाचा नाश आणि दुःख**
**नाशाकडे जाणारा आर्य अष्टांगिक मार्ग (या सर्वांचा**
**भगवंतांनी मला उपदेश केला). ॥१८६॥**

**मी त्यांचा उपदेश ऐकून शासनात रममाण होऊन आचरण करू लागले. बुद्धाच्या शासनाचे आचरण केले व तीन विद्या प्राप्त केल्या. ॥१८७॥**

**सर्व बाजूंनी तृष्णा नष्ट केली. अंधकार नष्ट केला. हे पापी मारा! मानवांचा अंत करणाऱ्या! आज तुझाच नाश झालेला आहे हे जाणून घे. ॥१८८॥**

## ६०. उपचाला

उपचाला थेरीचे जीवनचरित्र चाला थेरीप्रमाणेच आहे. चाला थेरीप्रमाणे ही सुद्धा प्रव्रजित झाली. थोड्याच दिवसात दिव्यज्ञानाचा साक्षात्कार केला. माराबरोबर वाद करतांना तिला आलेला अनुभव ती खालील शब्दात मांडत आहे :-

**मी स्मृतिमान, चक्षुमान व इंद्रियांची भावना केलेली (इंद्रियांचे दमन केलेली) भिक्खुणी आहे. मी श्रेष्ठ पुरुषाद्वारे मिळविल्या जाणाऱ्या शांत पदाची प्राप्ती केली आहे. ॥१८९॥**

मार—

**तुला जन्म कां आवडत नाही ? जन्म मिळाल्यावरच काम-तृष्णेचा उपभोग घेतला जातो. (म्हणून) कामतृष्णेचा उपभोग घे. शेवटी पश्चात्ताप करणारी होऊ नकोस. ॥१९०॥**

उपचाला—

**जन्मलेल्याला मरण असते. हात पाय तोडले जातात. वध, बन्धन (तुरुंग-वास) आदी क्लेश होतात. जन्माला आलेला प्राणी दुःखात पडतो. ॥१९१॥**

**अपराजित, सम्बुद्ध शाक्य कुळात जन्मले आहेत. त्यांनीच मला जन्मावर मात करणाऱ्या धम्माचा उपदेश केला. ॥१९२॥**

**दुःख, दुःखाची उत्पत्ती, दुःखाचा नाश आणि दुःख नाशाकडे जाणारा आर्य अष्टांगिक मार्ग (या सर्वांचा भगवंतांनी मला उपदेश केला). ॥१९३॥**

त्यांचा उपदेश ऐकून मी शासनात रममाण होऊन आचरण करू लागले. बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले व तीन विद्या संपादन केल्या. ॥१९४॥

सर्व बाजूंनी तृष्णा नष्ट केली. अंधकार नष्ट झाला. पापी मारा! मानवांचा अंत करणाऱ्या! आज तुझाच नाश झाला आहे हे जाणून घे. ॥१९५॥

अनुक्रमणिका

# आठवा वर्ग
# आठवा निपात

## ६१. सीसूपचाला

या थेरीचे जीवनचरित्र चाला भिक्खुणीप्रमाणे आहे. चाला भिक्खुणीप्रमाणेच ही सुद्धा प्रव्रजित झाली. थोड्याच दिवसात दिव्यज्ञानाचा साक्षात्कार केला. माराबरोबर वाद करतांना आलेला अनुभव तिने खालीलप्रमाणे सांगितला आहे :-

**मी शीलसंपन्न, इंद्रियावर चांगल्याप्रकारे संयम असलेली**
**भिक्खुणी आहे. (जात्याच) निर्मळ, तेजस्वी असे शांतपद**
**(निब्बाण) प्राप्त केले आहे. ॥१९६॥**

मार—

**त्रायस्त्रिंश, याम आणि तुषित लोकातील देव, निर्माणरती**
**तसेच वशवर्ती देव अशा लोकात जेथे तू पूर्वी राहिलीस**
**तेथे चित्त लागू दे. ॥१९७॥**

सीसूपचाला—

**त्रायस्त्रिंश, याम, तुषित हे देव आणि निर्माणरती व**
**वशवर्ती देव— ॥१९८॥**

**हे सर्व देव त्या त्या काळात व त्या त्या जन्मात आत्मवादात**
**गुरफटलेले असतात. ते जन्म-मरणाच्या चक्राला गती**
**देणारे असल्यामुळे त्यांनी आत्मवादावर विजय मिळविला**
**नाही. ॥१९९॥**

**हे सर्व जग अग्नीमध्ये जळत आहे, अग्नीमध्ये तापत आहे,**
**हे सर्व जग प्रज्वलित होत आहे, हे सर्व जग प्रकम्पित**
**होत आहे. ॥२००॥**

**अकंपित, अतुलनीय, ज्ञानी जनाकडून सेवित अशा धम्माचा**
**मला भगवान बुद्धाने उपदेश केला. तेथेच माझे मन रमले**
**आहे. ॥२०१॥**

**मी त्यांचे वचन ऐकून शासनात रममाण होऊन आचरण**

करू लागले. बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले व तीन विद्या प्राप्त केल्या. ॥२०२॥

सर्व बाजूंनी तृष्णा नष्ट केली व अंधकार नष्ट केला. पापी मारा! मानवाचा अंत करणाऱ्या! आज तुझाच नाश झाला आहे हे जाणून घे. ॥२०३॥

अनुक्रमणिका

# नववा वर्ग
# नववा निपात

## ६२. वड्ढमाता

भरूकच्छ (भडोच) नगरीत वड्ढमातेचा जन्म झाला होता. एका प्रतिष्ठित कुटुंबातील ही मुलगी. विवाह झाल्यानंतर एका सुंदर मुलाला जन्म दिला. त्याचे 'वड्ढ' असे नाव ठेवले. तेव्हापासून 'वड्ढमाता' म्हणून तिला संबोधले जाऊ लागले. एके दिवशी एका भिक्खुणीचा उपदेश ऐकून तिला धम्माप्रती श्रद्धा उत्पन्न झाली. त्यामुळे मुलाला नातलगाकडे सोपवून ती प्रव्रजित झाली. काही दिवसांनी 'वड्ढ' सुद्धा प्रव्रजित झाला. एके दिवशी आईला भेटण्याकरिता वड्ढ एकटाच भिक्खुणी संघात गेला. त्याला पाहून आईने उपदेश केला. तो उपदेश खालीलप्रमाणे आहे :-

**"बाळ वड्ढ! तू या जगातील तृष्णारूपी अरण्यात केव्हाच**
**प्रवेश करू नकोस. हे मुला, तू वारंवार दुःखाचा भागीदार**
**होऊ नकोस. ॥२०४॥**

**बाळ वड्ढ! मुनींनी निष्पाप होऊन व संशय नष्ट करून**
**इंद्रियांचे दमन केले आहे, तसेच ते शांत व अनाश्रव**
**(चित्तमलरहित) होऊन सुखाने विहार करतात. ॥२०५॥**

**बाळ वड्ढ! तू सुद्धा सम्यक् दर्शनाच्या प्राप्तीकरिता**
**आणि दुःखाचा अंत (नाश) करण्याकरिता त्या ऋषींनी**
**आचरलेल्या मार्गाचे दृढ आलंबन कर." ॥२०६॥**

हा आईचा उपदेश ऐकून वड्ढ म्हणाला—

**"हे आई! एखाद्या विशारद भिक्खुणीप्रमाणे हा अर्थ तू**
**मला सांगत आहेस. हे आई! तुझ्यामध्ये तृष्णारूपी अरण्य**
**खरोखर नाही असे मला वाटत आहे." ॥२०७॥**

यावर आई उपदेश देते—

**"बाळ वड्ढ! हीन, मध्यम आणि उत्कृष्ट असे जे काही**
**संस्कार आहेत त्यांच्याबद्दल अणुमात्र सुद्धा तृष्णा**
**माझ्यामध्ये नाही. ॥२०८॥**

**अप्रमादी (आळसरहित) होऊन ध्यान केल्याने माझे सर्व**
**आश्रव (चित्तमल) नष्ट झाले आहेत. मी भगवान**

बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले व तीन विद्या प्राप्त
केल्या."॥२०९॥

हे ऐकून वड्ढ आनंदाने म्हणाला—

"माझ्या आईने माझ्यावर अनुकम्पा दाखवून (उपदेशरूपी)
पराणीने चांगलीच टोचणी दिली व परमार्थदर्शक
गाथांचा उपदेश केला. ॥२१०॥

आईने उपदेशिलेले वचन ऐकून मला बन्धनमुक्त अशा
(निब्बाणाच्या) प्राप्तीकरिता एक प्रकारची धार्मिक
हुरहुर लागली. ॥२११॥

नंतर मी वीर्यवान, दृढनिश्चयी, रात्रंदिवस आळसरहित
होऊन निब्बाण साधना करू लागलो. आईच्या उपदेशाची
टोचणी लागल्यामुळे मी शांत झालो आणि उत्तम शांतीचे
पद (निब्बाण) प्राप्त केले." ॥२१२॥

अनुक्रमणिका

# दहावा वर्ग
# अकरावा निपात

## ६३. किसा गोतमी

श्रावस्तीमध्ये एका दरिद्री कुटुंबात ही जन्मली होती. 'गोतमी' हे तिचे नाव होते. परंतु अतिशय कृश असल्यामुळे 'किसा गोतमी' या नावाने ओळखली जाऊ लागली. गरीब कुटुंबातील असल्यामुळे नवऱ्याच्या घरी तिचा कोणीच आदर करीत नसे. काही दिवसांनी तिला मुलगा झाला. आता मात्र घरात तिचा आदर होऊ लागला. परंतु मुलगा बाल्यावस्थेतच मरण पावला. ही आपत्ती सहन न झाल्यामुळेच ती वेडी झाली. 'माझा पूर्वी आदर होत नव्हता. मुलगा झाल्यामुळे आदर होऊ लागला. त्यामुळे हे लोक मुलाला हिसकावून घेऊ इच्छितात.' असे म्हणून वेडाच्या झटक्यामुळे मेलेल्या मुलाला कडेवर घेऊन 'माझ्या मुलाला औषध द्या.' असे म्हणून ती घरोघरी औषध मागण्यासाठी फिरू लागली. लोक थट्टा करीत. औषध कोणाकरिता पाहिजे असे तिला विचारीत. ती त्यांचे ऐकत नसे. एका सज्जन माणसाला तिची ही शोचनीय अवस्था पाहून दया आली. तो म्हणाला, 'बाई, तुझ्या मुलाकरिता औषध भगवान सम्यक् सम्बुद्धाकडे जाऊन माग.' हे ऐकून ती शास्त्याच्या उपदेशाचे वेळी विहारात गेली व म्हणाली, 'भगवंत, माझ्या मुलाकरिता औषध द्या.' यावर भगवंत तिला म्हणाले, 'नगरात जाऊन ज्या घरी पूर्वी कोणीच मरण पावले नाही अशा घरातून अगोदर सरसू घेऊन ये.' 'भन्ते, ठीक आहे' म्हणून व आनंदित होऊन सरसू आणण्याकरिता ती नगरात गेली. या घरून त्या घरी अशी संपूर्ण नगरात सरसूकरिता फिरली. परंतु ज्या घरात पूर्वी कोणी मरण पावले नाही असे घर तिला सापडले नाही. शेवटी निराश होऊन अनित्यता हा जगाचा धर्म आहे हे जाणून आपले मेलेले मूल स्मशानात सोडून ती शास्त्याकडे परत आली. शास्त्याने तिला पाहिल्याबरोबर विचारले, 'गोतमी, सरसू मिळाले?' तिने उत्तर दिले, 'भन्ते, सरसू राहू द्या; त्याचे आता प्रयोजन राहिले नाही. भगवंतांनी मला प्रव्रज्या द्यावी. मी बुद्ध, धम्म आणि संघाला शरण जाते.' भगवंतांनी तिला उपदेश दिला आणि भिक्खुणी संघात प्रवेश घेण्याकरिता परवानगी दिली. दृढ साधना करून थोड्याच दिवसात किसा गोतमीने अर्हत्पदाचा साक्षात्कार केला. रूक्ष चीवर धारण करणाऱ्या भिक्खुणीमध्ये ती प्रमुख समजली जात होती. दिव्यज्ञानाच्या प्राप्तीनंतर आपला पूर्वानुभव कथन करतांना किसा गोतमी आनंदाने गाते :-

**कल्याणकारी पुरुषाबरोबर मित्रता करावी असे मुनीने**
**(भगवान बुद्धाने) लोकांना उद्देशून सांगितले आहे.**
**कल्याणकारी मित्राची सेवा केल्याने मूर्ख सुद्धा पंडित**
**होतो. ॥२१३॥**

**सत्पुरुषाची सेवा करावी. त्यामुळे सेवा करणाऱ्याच्या**
**ज्ञानाची वाढ होते. त्याचप्रमाणे सत्पुरुषाची सेवा करणारा**
**सर्व दुःखापासून मुक्त होतो. ॥२१४॥**

**दुःख, दुःखाची उत्पत्ती, दुःख नाश व दुःख नाशाचा**
**अष्टांगिक मार्ग ही चार आर्य सत्ये जाणावीत. ॥२१५॥**

‘स्त्री-जन्म दुःखदायक आहे’ असे मनुष्यांमध्ये दमन करण्यास योग्य असलेल्या माणासांचे दमन करणाऱ्या सारथी स्वरूप भगवंतानी म्हटले आहे. सवतीचा सहवास दुःखकारक आहे आणि एकदा प्रसूत झालेल्या स्त्रियांना सुद्धा दुःख आहे. ॥२१६॥

कोणी आपला गळा कापतात, सुंदर तरुणी विषप्राशन करतात. आई व तिच्या पोटातील जीव घेणारा (निष्क्रिय) गर्भ दोघेही आपत्तीचा (संकटाचा) अनुभव घेतात. ॥२१७॥

“बाळंतपणाकरिता स्वतःच्या घरी जात असता (पटाचारेने) रस्त्यात मेलेल्या पतीला पाहिले. स्वतःच्या घरी येण्यापूर्वी रस्त्यातच बाळंत झाली. ॥२१८॥

अभागी असलेल्या तिचे दोन पुत्र मरण पावले. रस्त्यात पती मरण पावला. आई, वडील आणि भाऊ एकाच चित्तेवर जाळले गेले.” ॥२१९॥

“भाग्यहीन दरिद्री (स्त्रिये), तू अपरिमित दुःखाचा अनुभव घेतलास. अनेक हजार जन्मात तू पुष्कळ अश्रू ढाळलेस. ॥२२०॥

(मागील जन्मांतून) तू स्मशानात वास केलास आणि स्वतःच्या मुलाबाळांचे मांस खाल्ले आहेस. कुळ नष्ट झालेल्या, सर्वांनी उपेक्षा केलेल्या, व पती मेलेल्या तू अमृत (निब्बाण) प्राप्त केले आहेस.” ॥२२१॥

“अमृत-पदाला (निब्बाणाला) जाणाऱ्या आर्य अष्टांगिक मार्गाची मी भावना केली. निब्बाणाचा साक्षात्कार केला व धम्मरूपी दर्पण मी पाहिला. ॥२२२॥

“मी आज छिन्न-शल्य व (संसाराचे) ओझे फेकलेली अशी आहे. माझे सर्व कर्तव्य पूर्ण झाले आहे” (सर्व बंधनापासून) चित्त विमुक्त झालेली किसा गोतमी थेरी असे म्हणाली. ॥२२३॥

अकरावा वर्ग

बारावा निपात

अनुक्रमणिका

## ६४. उप्पलवण्णा

श्रावस्तीमध्ये एका कोषाध्यक्षाच्या कुटुंबात जन्म झाला होता. नीलकमलाप्रमाणे तिचा रंग असल्यामुळे तिचे नाव 'उप्पलवण्णा' असे ठेवण्यात आले. विवाहाचे वय झाल्यावर पुष्कळ राजकुमारांनी व श्रेष्ठी-पुत्रांनी तिच्याशी लग्न करण्याकरिता निरोप पाठविला– 'तुमची कन्या आम्हाला द्या.' श्रेष्ठी विचार करू लागला की, सर्वांना संतुष्ट करणे अशक्य आहे. या परिस्थितीत त्याने उप्पलवण्णयास विचारले की, ती प्रव्रज्या घेण्यास तयार आहे की नाही? 'मी प्रव्रज्या घेण्यास तयार आहे' असे तिने वडिलांना उत्तर दिले. वडिलांनी स्वतः सन्मानाने तिला एका भिक्खुणीकडे नेऊन प्रव्रज्येची याचना केली. प्रयत्नपूर्वक साधना करीत उप्पलवण्णाने अर्हत्पदाचा साक्षात्कार केला. ऋद्धि-सिद्धि प्राप्त केलेल्या भिक्खुणींमध्ये ही सर्वश्रेष्ठ समजली जाऊ लागली. ऋद्धि-सिद्धि प्राप्त झाल्याच्या आनंदात ती एका मातेला उपदेश करते. या बाईची मुलगी आणि स्वतः ही बाई एका पुरुषावर आसक्त झाल्या होत्या. त्यामुळे आई व मुलगी अशा दोघीही मायलेकी एकमेकांच्या सवती झाल्या होत्या. परंतु शेवटी पश्चात्ताप होऊन या दोघींनीही ह्या दूषित जीवनाचा त्याग करून व राजगृह नगरीत जाऊन प्रव्रज्या घेतली. ज्या पुरुषाबरोबर त्या राहत होत्या त्याने सुद्धा प्रव्रज्या घेतली. तो गंगेच्या किनाऱ्यावर राहू लागला. पुढे तो 'गंगा-तीर-वासी स्थविर' या नावाने प्रसिद्ध झाला. पहिल्या तीन गाथा पतित आईच्या संदर्भातील आहेत. पुढच्या तीन गाथा आपला अनुभव सांगतांना उप्पलवण्णेने म्हटल्या आहेत आणि शेवटच्या गाथांमध्ये माराबरोबर झालेला संवाद आहे.

**"आई आणि मुलगी आम्ही दोघी (एकमेकांच्या) सवती**
**होतो. त्यामुळे मला अद्‌भुत व रोमांचित करणारे वैराग्य**
**उत्पन्न झाले. ॥२२४॥**

**अपवित्र दुर्गन्धमय, पुष्कळ काट्यांनी भरलेल्या या कामतृष्णेचा**
**धिक्कार असो. कारण त्यामुळेच आम्ही आई व**
**मुलगी (घरच्या घरात) सवती झालो." ॥२२५॥**

**"कामतृष्णांचा दुष्परिणाम पाहून आणि निष्काम भाव**
**कल्याणकारक आहे हे पाहून राजगृहामध्ये घरातून बेघर**
**होऊन ती (आई) प्रव्रजित झाली." ॥२२६॥**

योग सिद्धि प्राप्त झाल्याच्या आनंदात उप्पलवण्णा म्हणते–

**मी पूर्व-जन्म जाणते, दिव्यचक्षु विशोधित केला. परचित्तज्ञान**
**मला झाले. मी श्रोत्रधातुसुद्धा विशोधित केला. ॥२२७॥**

**ऋद्धि-सिद्धीचा मी साक्षात्कार केला. आश्रवाच्या नाशाला**
**सुद्धा मी प्राप्त झाले आहे. (मी चित्तमलाचा नाश केला**
**आहे). मी ह्या सहा अभिज्ञा (दिव्यज्ञान) प्राप्त केल्या**
**व बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले. ॥२२८॥**

**मी ऋद्धि-सिद्धीने चार घोड्यांचा रथ तयार करून**
**कोणत्याही परिस्थितीत समता न ढळू देणाऱ्या लोकनाथ**
**भगवान बुद्धाच्या पायांना वंदन केले. ॥२२९॥**

शालवनात बसून ती एकदा ध्यानभावना करीत होती. त्यावेळी मार तेथे येऊन तिला पदभ्रष्ट करण्याचा प्रयत्न करू लागला. त्यावेळी झालेला त्यांचा संवाद पुढील गाथांमध्ये मांडलेला आहे -

मार—

**"फुलांनी चांगल्याप्रकारे बहरलेल्या शाल झाडाजवळ येऊन**
**तू एकटीच झाडाखाली बसली आहेस. तुझ्या बरोबर**
**कोणीसुद्धा दुसरा नाही. हे मूर्खे! तुला धूर्त लोकांची भीती**
**वाटत नाही काय ?" ॥२३०॥**

उप्पलण्णा—

**"तुझ्यासारखे एक हजार धूर्त जरी एकत्र आले तरी माझा**
**एक केससुद्धा वाकडा करू शकत नाहीत, किंवा विचलित**
**करू शकत नाही. हे मारा! तू एकटा माझे काय करशील? ॥२३१॥**

**ही मी अंतर्धान पावते आणि तुझ्या उदरात प्रवेश करते.**
**मी तुझ्या भुवयामध्ये लपते. तेथे लपल्यावर तू मला पाहू**
**शकणार नाहीस. ॥२३२॥**

**मी चित्त ताब्यात ठेवले आहे. ऋद्धि-सिद्धीची चांगली**
**भावना केली आहे (ऋद्धि-सिद्धि प्राप्त केली आहे). मी**
**सहा अभिज्ञा प्राप्त केल्या आहेत आणि बुद्धाच्या शासनाप्रमाणे**
**आचरण केले आहे. ॥२३३॥**

**शरीराला विद्ध करणाऱ्या भाल्याच्या टोकाप्रमाणे कामतृष्णा**
**आहेत. त्यांच्यामुळे स्कन्धमय (प्राण्यांचा) नाश**
**होतो. ज्याला तू कामसुख म्हणतोस त्याबाबतीत आता**
**मला अनासक्ती आहे. ॥२३४॥**

**माझी तृष्णा सर्व ठिकाणातून नष्ट झाली आहे. माझा**
**अज्ञानांधकार सुद्धा नष्ट झाला आहे. हे प्राण्यांचा नाश**
**करणाऱ्या! पापी मारा! आज तुझाच नाश झालेला**
**आहे हे जाणून घे." ॥२३५॥**

अनुक्रमणिका

# बारावा वर्ग
# सोळावा निपात

## ६५. पुण्णिका

पुण्णिकेचा श्रावस्तीमध्ये जन्म झाला होता. श्रावस्तीचा कोषाध्यक्ष अनाथपिण्डिक ह्याच्या घरी असलेल्या दासीची ही मुलगी. सीहनादसुत्ताचा उपदेश ऐकून हिला स्रोतापत्तीफळाची प्राप्ती झाली. एके दिवशी पाण्याने स्नान केल्याने शुद्धी होते असे मानणाऱ्या एका ब्राह्मणाला पुण्णिकेने विशुद्धीच्या (खऱ्या) मार्गाकडे वळविले. त्यामुळे अनाथपिण्डिकाला तिच्या बाबतीत खूप श्रद्धा वाटू लागली. त्यामुळे त्याने तिला दास्यातून मुक्त केले. काही दिवसांनी ती अनाथपिण्डिकाच्या परवानगीने भिक्खुणी संघात प्रविष्ट झाली. ध्यान-साधना करीत तिने अल्पावधीत अर्हत्पदाचा साक्षात्कार केला. ब्राह्मणाबरोबर झालेला संवाद आणि आपला पूर्वानुभव कथन करतांना ती म्हणते :-

**"मी (पूर्वी) पाणी भरणारी होते. मालकांच्या दण्डाच्या**
**भीतीने आणि त्यांच्या रागीट शब्दांच्या भीतीने त्रस्त**
**होऊन मी सतत थंड पाण्यात उतरत असे. ॥२३६॥**

**हे ब्राह्मणा! तू कोणाच्या भीतीने सतत (थंडगार)**
**पाण्यात उतरतोस आणि थंडीने कुडकुडणाऱ्या शरीराने**
**कडाक्याच्या थंडीचा अनुभव घेतोस ?" ॥२३७॥**

**"पुण्णिके! जाणत असून सुद्धा तू मला विचारतेस.**
**कुशल कर्म करण्यासाठी व घडलेले पापकर्म नष्ट करण्यासाठी**
**मी हे पुण्य-कर्म करतो. ॥२३८॥**

**जो वृद्ध अथवा तरुण पापकर्म करतो तोसुद्धा पाण्यात**
**स्नान केल्याने पापकर्मापासून मुक्त होतो." ॥२३९॥**

**"पाण्यात स्नान केल्याने पापकर्मापासून मुक्ती मिळते**
**हे तुला अज्ञान्याला कोणत्या अडाण्याने सांगितले ? ॥२४०॥**

**(पाण्यात स्नान केल्याने जर पापापासून मुक्ती मिळते**
**तर मग) सर्व बेडूक, कासव, साप, सुसर, मगर आणि**
**पाण्यात राहणारे इतर प्राणी सर्वचे सर्व निश्चित स्वर्गात**
**जातील. ॥२४१॥**

**(पाण्यात स्नान केल्याने जर पापापासून मुक्ती मिळते**
**तर मग) मेंढ्यांचे मांस विकणारे, डुकराचे मांस विकणारे**

खाटिक, कोळी, हरण पकडणारे पारधी, चोर, वध करणारे
आणि इतर सर्व पापकर्म करणारेही पाण्यात स्नान
केल्याने पापकर्मापासून मुक्त होतील. ॥२४२॥

जर ह्या नद्या (त्यांच्यामध्ये स्नान केल्याने) तू पूर्वी
केलेले पाप वाहून नेतील तर मग तुझे पुण्यसुद्धा का वाहून
नेणार नाहीत ? त्यामुळे तू पुण्यरहित होशील. ॥२४३॥

हे ब्राह्मणा! ज्याला भिऊन तू सतत पाण्यात उतरतोस
तेच हे ब्राह्मणा, तू करू नकोस व आपल्या शरीराला
थंडीची पीडा देऊ नकोस." ॥२४४॥

"कुमार्गाला लागलेल्या मला स्नानापासून (परावृत्त
करून) आर्य मार्गावर आणलेस. हे देवी! हे वस्त्र मी
तुला दान देतो." ॥२४५॥

"हे वस्त्र तुझे तुलाच लाभो. मला वस्त्राची इच्छा नाही.
जर तू दुःखाला भितोस व जर तुला दुःख अप्रिय आहे तर
मग उघडपणे अथवा गुप्तपणे पापकर्म करू नकोस. जर तू
पापकर्म करशील अथवा करीत असशील तर पळून जाऊ
म्हटले तरी तुझी दुःखापासून सुटका नाही ॥२४६-२४७-२४८॥

जर तू दुःखाला भितोस व जर तुला दुःख अप्रिय आहे
तर मग बुद्ध, धम्म आणि कोणत्याही परिस्थितीत समता
ढळू न देणाऱ्यांच्या संघाला शरण जा. (पंच) शील
ग्रहण कर. तेच तुझ्या कल्याणाचे होईल." ॥२४९॥

"मी बुद्ध, धम्म आणि कोणत्याही परिस्थितीत समता
ढळू न देणाऱ्यांच्या संघाला शरण जातो. (पंच) शील
ग्रहण करतो. तेच माझ्या हिताचे होईल. ॥२५०॥

मी पूर्वी नाममात्र ब्राह्मण होतो. आज मी खरा ब्राह्मण
झालो आहे. तीन विद्या जाणणारा, वेदसंपन्न, श्रोत्रिय
आणि (खऱ्या अर्थाने) स्नातक आहे." ॥२५१॥

# तेरावा वर्ग
# विसावा निपात

## ६६. अम्बपाली

वैशालीमधील राज-उद्यानात आम्रवृक्षाखाली आम्रपालीचा जन्म झाला होता. उद्यान रक्षकाने नगरीत नेले. आम्रवृक्षाखाली जन्म झाला म्हणून 'आम्रपाली' असे नाव पडले. ती अतिशय सुंदर दिसत होती. वैशालीतील राजकुमारांनी तिच्याबरोबर लग्न करण्यासाठी आपसात स्पर्धा करण्याला सुरुवात केली. आपसातील अशा प्रकारचा संघर्ष पाहून असा निर्णय घेण्यात आला की ही कोणाही एकाची पत्नी न होता ती सर्वांचीच पत्नी राहील. या निर्णयानुसार तिला गणिका करण्यात आले. भगवान बुद्ध जेव्हा वैशालीत आले होते तेव्हा ते भिक्खुसंघासह आम्रपालीच्या आम्रवनातच राहिले होते. आम्रपालीने तेथे जाऊन भगवंताच्या चरणांना वंदन करून त्यांना भोजनाकरिता निमंत्रित केले. दुसऱ्या दिवशी भगवंत तिच्या घरी भोजनाकरिता गेले. भोजन संपल्यावर भगवंतांनी तिला धम्मोपदेश केला. त्यानंतर आम्रपालीने आपले उपवन बुद्ध-प्रमुख भिक्खुसंघाला दान दिले. अशाप्रकारे ती बुद्धाची उपासिका बनली. आपला प्रव्रजित झालेला पुत्र विमलकौण्डिन्य याचेजवळ धम्म ऐकून तिने भिक्खुणीसंघात प्रवेश घेतला. वृद्धावस्थेत झालेले आपल्या शरीरातील परिवर्तन पाहून तिला बुद्धवचनाची सत्यता ['सर्व प्रकारचे रूप अनित्य व जीर्ण होणारे आहे' ह्या बुद्धवचनाला अनुसरूनच माझ्यात झालेला फरक आहे त्यामुळे बुद्धवचनाची सत्यताच पटली.] पटली. सर्व सांसारिक वस्तूंच्या अनित्यतेचे ज्ञान झाले. आपल्या जर्जर झालेल्या शरीराचे वर्णन करतांना ती म्हणते :-

**भुंग्याच्या रंगासारखे, काळे व कुरळे असे माझे केस होते,**
**ते आज म्हातारपणामुळे अंबाडीच्या तागाप्रमाणे झाले**
**आहेत. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२५२॥**

**सुगंधी फुलाने भरलेल्या सुवासिक फुलांच्या करंड्याप्रमाणे**
**माझा केशसंभार होता. आज म्हातारपणामुळे**
**माझ्या मूळ केसांचा वासच राहिला आहे. सत्यवादी**
**(बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२५३॥**

**कंगवा आणि काट्यांनी चांगल्या प्रकारे बसविलेला माझा**
**केशसंभार चांगल्या प्रकारे लावलेल्या व घनदाट अरण्याप्रमाणे**
**सुशोभित होता. तो आज म्हातारपणामुळे ठिकठिकाणी**
**केस गळाल्यामुळे विरळ झालेला आहे. सत्यवादी**
**(बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२५४॥**

**काळ्या पुंजक्याची, सोन्याने सजविलेली माझी अलंकृत**
**वेणी शोभून दिसत असे. आज म्हातारपणामुळे माझ्या**
**डोक्याला टक्कल पडत चाललेले आहे. सत्यवादी (बुद्धा) चे**
**वचन मिथ्या होत नाही. ॥२५५॥**

चित्रकाराने कुशलतेने अंकित केलेल्या रेखांप्रमाणे माझ्या दोन भुवया होत्या. त्या आज म्हातारपणामुळे सुरकुत्या पडून खाली लोंबत आहेत. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२५६॥

गडद निळ्या रंगाचे, सुंदर मण्याप्रमाणे, तेजस्वी व विशाल असे माझे डोळे होते. ते आज म्हातारपणामुळे अभिहत झाल्याने सुंदर दिसत नाहीत. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२५७॥

तारुण्यात आल्यावर सुंदर व टोकदार असे माझे नाक शोभून दिसत असे. ते आज म्हातारपणामुळे विशोभित होऊन (चपटे) झाले आहे. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२५८॥

चांगल्या प्रकारे तयार केलेल्या, सुघटित कंकणाप्रमाणे (गोल) माझ्या कानाच्या पाळी पूर्वी शोभून दिसत होत्या त्या आज म्हातारपणामुळे सुरकुत्या पडून खाली लोंबत आहेत. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२५९॥

कर्दलीच्या कळीप्रमाणे रंग असलेले माझे दात पूर्वी शोभून दिसत असत. परंतु आज ते म्हातारपणामुळे पडून (खंडित होऊन ) जवाप्रमाणे पिवळे झाले आहेत. सत्यवादी (बुद्धा ) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६०॥

वनामध्ये विचरण करणाऱ्या कोकिळेच्या मधुर कूजनाप्रमाणे माझी वाणी मधुर होती. ती आज म्हातारपणामुळे अडखळणारी झाली आहे. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही . ॥२६१॥

चांगल्याप्रकारे घासून गुळगुळीत केलेल्या शंखाप्रमाणे माझा मान पूर्वी शोभून दिसत होती. परंतु आज म्हातारपणामुळे भग्न झाली व वाकली आहे. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६२॥

सुंदर गोल अडसराप्रमाणे माझे दोन्ही बाहू शोभून दिसत असत. परंतु आज म्हातारपणामुळे ते पांढऱ्या फटफटित पाटलीवृक्षाच्या फांदीप्रमाणे झाले आहे. सत्यवादी

(बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६३॥

सुंदर अंगठी आणि सुवर्णालंकारांनी सजविलेले माझे हात पूर्वी शोभून दिसत असत. ते आज म्हातारपणामुळे मुळ्याप्रमाणे (पांढरे फटफटित) झाले आहेत. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६४॥

घट्ट, गोल, एकमेकाला जुळू पाहणारे आणि उन्नत असे माझे दोन्ही स्तन पूर्वी शोभून दिसत होते. ते आज म्हातारपणामुळे पाणी नसलेल्या चामड्याच्या रिकाम्या पखालीप्रमाणे खाली लोंबत आहेत. सत्यवादी (बुद्धा)चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६५॥

चांगल्याप्रकारे चकाकणाऱ्या सोन्याच्या फलकाप्रमाणे माझे शरीर पूर्वी शोभून दिसत होते. ते आज म्हातारपणामुळे सूक्ष्म सुरकुत्यांनी व्यापले आहे. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६६॥

हत्तीच्या अन्न सेवन करणाऱ्या सोंडेप्रमाणे माझ्या दोन्ही मांड्या शोभून दिसत होत्या. त्या आज म्हातारपणामुळे (पोकळ) बांबूच्या नळ्याप्रमाणे झाल्या आहेत. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६७॥

सुंदर नूपुर आणि सुवर्णालंकाराने सजविलेले माझे खालचे पाय शोभून दिसत होते. परंतु ते आज म्हातारपणामुळे तिळाच्या झाडाच्या दांड्याप्रमाणे झाले आहेत. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६८॥

कापसाप्रमाणे मऊ अशी माझी दोन्ही पावले पूर्वी शोभून दिसत होती. ती आज म्हातारपणामुळे फटा पडलेली व सुरकुत्या पडलेली आहेत. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२६९॥

एके वेळी हे (संपूर्ण) शरीर अशा प्रकारचे होते. परंतु आज म्हातारपणामुळे जर्जर, अनेक दुःखाचे घर झाले आहे. ते पोपडे पडलेल्या घराप्रमाणे जीर्ण झाले आहे. सत्यवादी (बुद्धा) चे वचन मिथ्या होत नाही. ॥२७०॥

अनुक्रमणिका

## ६७. रोहिणी

वैशालीमधील एका वैभवशाली ब्राह्मण कुटुंबात रोहिणीचा जन्म झाला होता. भगवान बुद्ध वैशालीत विहार करीत असतांना त्यांचा धम्मोपदेश ऐकला. त्यामुळे रोहिणीला धम्माप्रती श्रद्धा वाटू लागली. बौद्धांच्या संघाबद्दल तिला अतिशय आकर्षण वाटत असे. आई-वडिलांना एके दिवशी उपदेश केला व त्यांची परवानगी मिळविली. त्यानंतर भिक्खुणींच्या संघात प्रवेश केला. परिश्रमपूर्वक साधना करून थोड्याच अवधीत अर्हत्पद प्राप्त केले. 'मला भिक्खू संघ कां प्रिय वाटतो' ह्याचे ती वडिलांना उत्तर देते. अशाप्रकारे वडिलांशी झालेला तिचा संवाद खालीलप्रमाणे मांडलेला आहे :-

**"हे रोहिणी! श्रमणांचे नाव घेऊन तू निजतेस, श्रमणांचे**
**नाव घेऊन तू जागी होतेस (अशाप्रकारे प्रत्येक वेळी) तू**
**श्रमणांचे गुणगान करतेस. तू निश्चितच श्रमणी होशील. ॥२७१॥**

**तू श्रमणांना पुष्कळ अन्नपानाचे दान करतेस. हे रोहिणी,**
**मी आता विचारतो, 'तुला श्रमण कशामुळे प्रिय आहेत ? ॥२७२॥**

**हे श्रमण काम करण्यास तयार नसलेले, आळशी,**
**दुसऱ्याच्या दानावर जगणारे, लोभी व स्वादिष्ट भोजनाची**
**इच्छा करणारे आहेत. (असे असताही) तुला श्रमण**
**कशामुळे प्रिय आहेत ?" ॥२७३॥**

**"हे बाबा! तुम्ही श्रमणांच्या बाबतीत पुष्कळ वेळापासून**
**मला विचारत आहात. मी आज त्यांची प्रज्ञा, शील**
**(सदाचरण) आणि त्यांचा पराक्रम ह्यांचे वर्णन करते. ॥२७४॥**

**(श्रमण) कर्म करू इच्छिणारे, अनाळशी व श्रेष्ठ कर्म**
**करणारे आहेत. राग आणि द्वेष ह्यांचा ते त्याग करतात.**
**ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२७५॥**

**ते शुद्ध कर्म करणारे असून तिन्ही पापांची मुळे**
**(कायिक, वाचसिक व मानसिक) नष्ट करतात. त्याचप्रमाणे**
**त्यांचे सर्व पाप नष्ट झाले आहे. ह्यामुळे मला**
**श्रमण प्रिय आहेत. ॥२७६॥**

**त्यांचे कायिक कर्म शुद्ध आहे. वाचसिक कर्मसुद्धा तशाप्रकारे**
**(शुद्ध) आहे आणि त्यांचे मनोकर्मसुद्धा शुद्ध आहे.**
**ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२७७॥**

**शंख व मोत्याप्रमाणे ते निर्मळ आहेत. आतून व बाहेरून**

शुद्ध आहेत. सद्‌गुणांनी ते परिपूर्ण आहेत. ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२७८॥

ते बहुश्रुत, धम्मधर, आर्य (श्रेष्ठ) धम्माप्रमाणे जीवन जगणारे आहेत. धम्म आणि धम्माचा अर्थ ह्यांचा उपदेश करतात. ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२७९॥

ते बहुश्रुत, धम्मधर, आर्य (श्रेष्ठ) धम्माप्रमाणे जीवन जगणारे, एकाग्रचित्त आणि स्मृतिमान आहेत. ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२८०॥

ते दूर (जंगला) पर्यंत जाणारे, स्मृतिमान, शहाणपणाचे बोल बोलणारे, स्थिर चित्त असलेले आहेत. ते दुःखाचा अंत (नाश) जाणतात, ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२८१॥

ज्या गावाहून जातात तिकडे (कसलीही अपेक्षा ठेवून) अवलोकन करीत नाहीत. अनपेक्ष होऊनच जातात. ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२८२॥

जवळच्या वस्तू ते कोष्ठागारात किंवा मडक्यात, किंवा टोपलीत ठेवून (संचय करीत नाहीत). शिजवून तयार झालेले (अन्नच) ते शोधतात. ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२८३॥

ते सोने, नाणे, अथवा रुपे ग्रहण करीत नाहीत. (भूत भविष्याची चिंता न करता) वर्तमानकाळात जे मिळेल त्यावर आपला उदरनिर्वाह करतात. ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत. ॥२८४॥

वेगवेगळ्या कुळातून, वेगवेगळ्या जनपदातून ते प्रव्रजित झाले आहेत. (असे असूनसुद्धा) एकमेकांबरोबर प्रेमाने राहतात. ह्यामुळे मला श्रमण प्रिय आहेत.” ॥२८५॥

“हे रोहिणी! तू आमच्या कल्याणाकरिता या घरात जन्म घेतला आहेस. बुद्ध, धम्म आणि संघाप्रती तुझा आदर अतिशय गौरवास्पद आहे. ॥२८६॥

(संघ हा दान देण्यायोग्य) असे श्रेष्ठ पुण्यक्षेत्र आहे हे तू जाणतेस. हे श्रमण आमची ही दक्षिणा घेतील. येथे

**एकदा (दान) यज्ञ सुरू केला म्हणजे आम्हाला विपुल**
**फल-प्राप्ती होईल." ॥२८७॥**

**"जर तुम्ही दुःखाला भीत असाल, जर तुम्हाला दुःख**
**अप्रिय असेल, तर तुम्ही बुद्ध, धम्म आणि कोणत्याही**
**परिस्थितीत समता ढळू न देणाऱ्यांच्या संघाला शरण जा.**
**तसेच (पंच) शील ग्रहण करा. ते तुमच्या कल्याणाकरिता**
**होईल." ॥२८८॥**

**"मी बुद्ध, धम्म आणि कोणत्याही परिस्थितीत समता**
**ढळू न देणाऱ्याच्या संघाला शरण जातो. तसेच (पंच)**
**शील ग्रहण करतो. ते माझ्या कल्याणाकरिता होईल. ॥२८९॥**

**मी पूर्वी ब्रह्मबंधू (नाममात्र ब्राह्मण) होतो. आता मात्र**
**मी (खरा) ब्राह्मण आहे. मी त्रैविद्य (तीन विद्या**
**जाणणारा) श्रोत्रिय, वेद जाणणारा आणि स्नातक आहे." ॥२९०॥**

## ६८. चापा

वंगहार जनपदामध्ये एका प्रमुख पारध्याच्या कुटुंबात चापेचा जन्म झाला होता. भगवान बुद्ध सम्बोधि प्राप्तीनंतर धम्म-चक्र-प्रवर्तन करण्याकरिता वाराणसीला जात होते. उपक नावाचा आजीवक तपस्वी त्यांना रस्त्यात भेटला. उपक तपस्व्याने भगवान बुद्धाचा शुद्ध वर्ण व लावण्यमय शरीर पाहून त्यांना विचारले, 'मित्रा! तू कोणत्या कारणाने संसाराचा त्याग केला आहेत? तुझा गुरू कोण? व तुला कोणाचा धर्म आवडतो?' भगवान बुद्धाने उत्तर दिले, 'मी सर्वांवर विजय मिळविला आहे, सर्व जाणणारा, तृष्णेचा नाश करून मी विमुक्त झालो आहे, मी स्वतःच दिव्यज्ञान प्राप्त केले आहे. माझा कोणीही गुरू नाही. माझ्यासारखा दुसरा कोणी नाही. यावेळी मी धम्म-चक्र-प्रवर्तन करण्याकरिता वाराणसीला जात आहे. विमुक्तीचा सिंहनाद करून मी झोपलेल्या व आंधळ्या प्रजेला जागे करीन.' यावर उपक तपस्वी म्हणाला— 'तुझा उद्देश सफल होवो.' अशा प्रकारची सदिच्छा व्यक्त करून उपक तपस्वी दुसऱ्या एका पायवाटेने वंगहार प्रदेशाकडे निघून गेला. पारध्यांच्या सरदाराकडे तो अतिथी म्हणून राहिला. त्या पारध्याचीच चापा मुलगी होती. पारध्याच्या सरदाराने त्या तपस्व्याचा यथोचित आदरसत्कार केला. अशाप्रकारे उपक तपस्वी त्या पारध्याच्या घरी राहत असतांना एके दिवशी तो पारधी सरदार आपले पुत्र व भाऊ ह्यांना बरोबर घेऊन शिकारीसाठी अरण्यात गेला. जातेवेळी त्याने आपली मुलगी चापा हिला तपस्व्याची सेवा करण्यास सांगितले. चापा अतिशय सुंदर असल्याकारणाने तपस्वी तिच्यावर मोहित झाला. जेवणाचा त्याग करून त्याने प्रतिज्ञा केली की, जर मला चापा मिळाली तरच मी जिवंत राहीन अन्यथा आत्मघात करीन. पारध्यांचा सरदार काही दिवसानी परत आला. त्याने मरणाच्या वाटेला लागलेल्या तपस्व्याला पाहिले. त्याची सेवा करीत असता त्याला विचारले— 'आपल्याला कोणता आजार झाला आहे? माझ्याकडून जे होईल ते मी अवश्य करीन.' तेव्हा उपकाने आपल्या मनातील हेतू पारध्याला सांगितला. सरदाराने त्याला विचारले, 'तुम्हाला काही शिल्प (कला, धंदा) येते काय?' यावर उपकाने 'नाही' असे उत्तर दिले. सरदार पुनः म्हणाला— 'शिल्प न जाणणारा घर कसे सांभाळू शकेल?' यावर उपकाने उत्तर दिले, 'तुम्ही आणलेली शिकार खरेदी करून बाजारात तिची विक्री करीन.'

यानंतर सरदाराने आपली मुलगी उपकाला देण्याचे मान्य केले व त्या दोघांचे लग्नसुद्धा लावून दिले. काही दिवसांनी चापेला मुलगा झाला. त्याचे 'सुभद्र' असे नाव ठेवण्यात आले. मूल रडायला लागले की चापा त्याला गप्प करतांना पतीचा उपहास करीत नेहमी म्हणत असे, 'हे उपकाच्या मुला, गप्प हो. हे तपस्व्याच्या मुला, गप्प हो. हे मांसाचा व्यवहार करणाऱ्याच्या मुला, गप्प हो.' उपकाला हे ऐकून फार वाईट वाटत असे. एके दिवशी कंटाळून आपल्या बायकोला समजाविण्याच्या स्वरात म्हणाला– 'चापे! तू असे समजू नकोस की मी अगदी न कमविणारा आहे व माझा या जगात कोणीच मित्र नाही. सर्वांवर विजय मिळविलेल्या महापुरुषाबरोबर माझी मैत्री आहे. मी त्यांच्याकडे जाईन.' असे नवऱ्याने समजावूनसुद्धा ती त्याची थट्टा करण्यासाठी वर सांगितल्याप्रमाणे वारंवार म्हणत असे. एके दिवशी उपकाला राग आला व तो गृहत्याग करण्याकरिता निघाला. चापेने त्याला अडविण्याचा खूप प्रयत्न केला. परंतु व्यर्थ. उपकाने खरोखरच गृहत्याग केला. त्यावेळी भगवान बुद्ध श्रावस्तीमधील जेतवन विहारात विहार करीत होते. तेथे हा गेला. भगवंतांनी त्याला ओळखले व आतापर्यंत तो कोठे होता याविषयी चौकशी केली. तेव्हा उपकाने घडलेली सर्व हकीकत भगवंतांना सांगितली व प्रव्रज्या देण्याविषयी त्यांना विनंती केली. शास्त्याच्या आदेशानुसार तो प्रव्रजित झाला. ध्यानभावना करीत राहू लागला. चापेला या घटनेमुळे अत्यंत दुःख झाले. तिने आपल्या मुलाला त्याच्या आजीकडे सोपविले. श्रावस्तीमध्ये येऊन भिक्खुणी संघात प्रव्रजित झाली. उपक आणि चापा यांचा संवाद खालील प्रकारे झाला. तो चापेने गाथाबद्ध केला व स्वतःचा पूर्वानुभव म्हणून ती गाऊ लागली :-

उपक–

**"पूर्वी दण्डधारी तपस्वी होतो. मी आज पारधी झालो**
**आहे. तृष्णेच्या घोर चिखलात फसल्यामुळे बाहेर**
**निघण्याकरिता असमर्थ झालो आहे. ॥२९१॥**

**'आपल्या सौंदर्यावर मोहित झाला' असे मला समजून**
**चापा (माझा उपहासपूर्वक उल्लेख करीत) मोठ्या खुषीत**
**मुलाला शांत करीत असे. चापेचे बन्धन तोडून मी पुनः**
**प्रव्रजित होईन." ॥२९२॥**

चापा–

**"हे महावीरा! माझ्यावर रागावू नका. हे महामुनी !**
**माझ्यावर रागावू नका. क्रोधाच्या आधीन झालेल्यांना**
**आत्मशुद्धी व तप प्राप्त होत नाही." ॥२९३॥**

उपक–

**"मी ह्या 'नाला' नावाच्या गावातून निघून जाईन. आता**
**कोण ह्या नाला गावात राहील ? येथे धर्मजीवी श्रमण**
**स्त्री-सौंदर्याने बांधले जातात." ॥२९४॥**

चापा—

“हे काळ्या! (उपक काळा असल्यामुळे त्याला तसे म्हटले असावे.) परत ये. पूर्वीप्रमाणेच तू कामसुखाचा उपभोग घे. मी तुझी दासी आहे व माझे नातलगसुद्धा तुझे दास्यत्व पतकरतात.” ॥२९५॥

उपक—

“हे चापे! ज्याप्रमाणे तू म्हणतेस त्याप्रमाणे याचा चतुर्थांश भाग जरी तुझ्यावर अनुरक्त (मोहित) झालेल्या पुरुषाला मिळाला तरी ती एक मोठीच गोष्ट होईल.” ॥२९६॥

चापा—

“हे काळ्या! गिरीशिखरावर फुललेल्या हदग्याच्या वृक्षाप्रमाणे, फुललेल्या डाळिंबाच्या फांदीप्रमाणे अथवा बेटावर उत्पन्न झालेल्या पाटलीप्रमाणे (मी सौंदर्य व तारुण्यसंपन्न आहे.) ॥२९७॥

शरीराला पिवळ्या चंदनाचा लेप लावणाऱ्या, काशीचे उत्तम वस्त्र परिधान करणाऱ्या मला सोडून तू कां जात आहेस ?” ॥२९८॥

उपक—

“पक्षिणीला पकडणाऱ्या शिकाऱ्याप्रमाणे तू मला बांधू इच्छितेस. परंतु सौंदर्यसंपन्न रूपाने तू मला बाधा करू शकणार नाहीस.” ॥२९९॥

चापा—

“हे काळ्या ! तू उत्पन्न केलेले हे माझे पुत्रफळ आहे . अशाप्रकारे पुत्रवती असणाऱ्या मला सोडून तू कां जातोस ?” ॥३००॥

उपक—

“ज्ञानी लोक पुत्र, नातलग आणि धनाचा त्याग करतात

व ते महावीर बंधन तोडून मुक्त होणाऱ्या हत्तीप्रमाणे
प्रव्रज्या घेतात."॥३०१॥

चापा—

"जर मी आताच तुझ्या ह्या पुत्राला काठीने अथवा सुरीने
मारून खाली जमिनीवर पाडले, तर तू पुत्रशोकामुळे
जाणार नाहीस." ॥३०२॥

उपक—

"जर तू पुत्राला कोल्ह्याच्या अथवा (शिकारी) कुत्र्याच्या
पुढे टाकलेस तरी हे दुष्टे ! तू मला पुत्राकरिता परत
फिरवू शकणार नाहीस." ॥३०३॥

चापा—

"हाय ! हे काळ्या आता तू जा; तुझे कल्याण होवो.
परंतु तू कोणत्या गावाला, कोणत्या नगराला, आणि
कोणत्या राजधानीला जाणार (ते सांग)." ॥३०४॥

उपक—

"मी पूर्वी श्रमण नसून सुद्धा स्वतःला श्रमण मानत असे
व गणात (संघात) राहात असे. एका गावाहून दुसऱ्या
गावाला, नगराला आणि राजधानीमध्ये विचरण करीत
असे. ॥३०५॥

ते भगवान बुद्ध नेरंजरा नदीच्या किनाऱ्यावर सर्व प्राणीमात्रांना
सर्व दुःखापासून मुक्त करण्याकरिता धम्माचा
उपदेश करतात. मी त्यांच्याच जवळ जाईन, तेच माझे
शास्ते (उपदेशक) होतील." ॥३०६॥

चापा—

"श्रेष्ठ लोकनाथ भगवान बुद्धांना (माझे) वंदन सांग
आणि प्रदक्षिणा करून माझी (आदराची) दक्षणा निवेदन
कर." ॥३०७॥

अनुक्रमणिका

उपक—

**“हे चापे ! हे जे तू बोलतेस, तो आमचा लाभ आहे. श्रेष्ठ लोकनाथ भगवान बुद्धाला मी तुझे वंदन सांगेन आणि प्रदक्षिणा करून त्यांना तुझी (आदराची) दक्षणा निवेदन करीन.” ॥३०८॥**

**त्यानंतर काळ (उपक) तेथून निघाला व नेरंजरा नदीच्या किनाऱ्यावर आला. (तेथे) त्याने अमृतपदाचा उपदेश करणाऱ्या भगवान बुद्धांना पाहिले. ॥३०९॥**

**दुःख, दुःखाची उत्पत्ती, दुःखावर मात आणि दुःखनाशाचा आर्य अष्टांगिक मार्ग ह्यांचा भगवान बुद्ध उपदेश करीत होते. ॥३१०॥**

**त्यांच्या चरणांना वंदन करून त्यांना प्रदक्षिणा करून चापेचा आदेश देऊन प्रव्रजित होऊन बेघर झाला. तीन विद्या प्राप्त केल्या आणि बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले. ॥३११॥**

## ६९. सुन्दरी

वाराणसीमध्ये एका ब्राह्मण कुटुंबात सुन्दरीचा जन्म झाला होता. सुजात हे तिच्या वडिलाचे नाव होते. अतिशय सुंदर असल्याकारणाने तिचे ‘सुन्दरी’ असे नाव ठेवण्यात आले. ती मोठी झाल्यावर तिचा लहान भाऊ मरण पावला. पुत्राच्या शोकाने पीडित झाल्यामुळे सुजात ब्राह्मण इकडे तिकडे भटकू लागला. एके दिवशी वासेट्ठी नावाच्या भिक्खुणीबरोबर त्याची भेट झाली. भिक्खुणीने त्याच्या शोकाचे कारण विचारले. तेव्हा ब्राह्मणाने आपल्या पुत्रशोकाचे वर्णन केले. यावर भिक्खुणीने स्वतःच्या पुत्र-वियोगाचे वर्णन केले व शेवटी ती म्हणाली- ‘असे असून सुद्धा मी आता शांत झाले आहे.’ सुजात ब्राह्मणाला हे कसे ते जाणून घेण्याची उत्सुकता वाटू लागली. त्याने भिक्खुणीला विचारले— ‘हे आर्ये! आपण दुःखापासून कशाप्रकारे विमुक्त झालात?’ भिक्खुणीने त्याला बुद्ध, धम्म आणि संघाला शरण जाण्याचा उपदेश केला. ब्राह्मणाने विचारले- ‘भगवान बुद्ध सध्या कोठे आहेत? भिक्खुणीने सांगितले— ‘भगवंत सध्या मिथिला नगरीत विहार करीत आहेत.’ ‘हे ऐकल्याबरोबर ब्राह्मणाने रथ तयार केला व तो मिथिला नगरीला गेला. तेथे गेल्यावर त्याने भगवंतांना वंदन केले व एका बाजूला बसला. भगवंतांनी धम्मोपदेश केल्यावर प्रव्रजित होऊन तो साधना करू लागला. त्याने तिसऱ्याच दिवशी अर्हत्पद प्राप्त केले. त्याचा सारथी वाराणसीला परत आला व त्याने ही घटना ब्राह्मणाच्या पत्नीला सांगितली. आपले वडील प्रव्रजित झाल्याचे कळल्यावर सुन्दरीने सुद्धा प्रव्रज्या घेण्याकरिता आईची परवानगी मागितली. आईने म्हटले— ‘मुली, या घरातील सर्व संपत्ती तुझी आहे. तूच या कुटुंबातील एकुलती एक उत्तराधिकारिणी आहेस. त्यामुळे प्रव्रज्या घेऊ नकोस.’ सुन्दरीने उत्तर दिले— ‘मला धनसंपत्तीचे काहीच प्रयोजन नाही. मला संसाराचा त्याग करावयाचा आहे.’ शेवटी सर्व संपत्ती, घर, आई आणि नातलग ह्यांना सोडून ती प्रव्रजित झाली. परिश्रमपूर्वक साधना करीत तिने अर्हत्पद प्राप्त केले.

अर्हत्पद प्राप्तीच्या आनंदात विहार करीत असता 'आपण शास्त्याबरोबर सिंहनाद करावा' असा विचार तिच्या मनात आला. लगेच वाराणसीतून निघून पुष्कळ भिक्खूंबरोबर ती श्रावस्ती नगरीला जाण्याकरिता निघाली. श्रावस्तीत जाऊन भगवंतांना वंदन करून एका बाजूला उभी राहिली. भगवान बुद्धाने तिला परम ज्ञान प्राप्त झालेली साधिका म्हटले. दुसऱ्या दिवशी तिची आई तेथे आली व ती सुद्धा प्रव्रजित झाली. काही दिवसांनी आपल्या पूर्वजीवनाचे अवलोकन करीत असता वडील व वासेट्ठी ह्या दोघांचा झालेला संवाद तिला आठवला व त्या गाथा ती सतत म्हणू लागली :-

सुजात—

**"हे ब्राह्मणि वासेट्ठि! पूर्वी तुझे पुत्र मेले. (लौकिक भाषेत) तू खाल्लेस, असे असतांना तू रात्रंदिवस अतिशय पीडित झाली होतीस. ॥३१२॥**

**आज सर्वचे सर्व सात पुत्र तू खाल्लेस. असे असतांना सुद्धा कोणत्या कारणाने तू पीडित होत नाहीस?" ॥३१३॥**

वासेट्ठी—

**"हे ब्राह्मणा! तुझे आणि माझे अनेक शेकडो पुत्र आणि अनेक शेकडो जातीबांधव भूतकाळात खाल्ले गेले. ॥३१४॥**

**परंतु आज मी जन्म आणि मरणापासून मुक्ती जाणली आहे. त्यामुळेच मी शोक करीत नाही. रडत नाही व दुःखित होत नाही." ॥३१५॥**

सुजात—

**"हे वासेट्ठि! तू ही अद्भुत वाणी (वचन) बोलत आहेस. तू कोणाचा धम्म जाणून अशाप्रकारची वाणी बोलत आहेस?" ॥३१६॥**

वासेट्ठी—

**"हे ब्राह्मणा! मिथिला नगरीत असलेल्या सम्बुद्धाने सर्व प्राण्यांना दुःखाच्या नाशाकरिता धम्माचा उपदेश केला. ॥३१७॥**

**हे ब्राह्मणा! त्या अर्हताचा सर्व क्लेशांचा निरोधक धम्म ऐकून मला तेथे सद्धम्माचे ज्ञान झाले. (त्याचक्षणी) माझा पुत्र-शोक दूर झाला." ॥३१८॥**

अनुक्रमणिका

सुजात—

“मी सुद्धा मिथिला नगरीला जाईन. म्हणजे भगवंत मला
सर्व दुःखापासून मुक्त करतील.” ॥३१९॥

मिथिला नगरीत जाऊन ब्राह्मणाने विमुक्त व क्लेशरहित
अशा बुद्धाचे दर्शन घेतले. (तेव्हा) सर्व दुःखाच्या पलीकडे
गेलेल्या मुनीने त्याला धम्माचा उपदेश केला. ॥३२०॥

दुःख, दुःखाची उत्पत्ती, दुःखावर मात आणि दुःखनाशाचा
आर्य अष्टांगिक मार्ग (याचा भगवंतांनी उपदेश केला.) ॥३२१॥

त्यानंतर सद्धम्माचे ज्ञान झाल्यावर त्याने प्रव्रज्येची
याचना केली. (प्रव्रजित झाल्यावर) सुजात ब्राह्मणाने
तीन रात्रीत तीन विद्या प्राप्त केल्या. ॥३२२॥

सुजात—

“हे सारथि! माझा रथ घेऊन जा व तो घरी परत दे.
ब्राह्मणीला कुशल सांग. सुजात ब्राह्मण प्रव्रजित झाला
आहे व त्याने तीन विद्या प्राप्त केल्या. (हे सुद्धा सांग.)” ॥३२३॥

तेव्हा सारथी रथ व (खर्चाकरिता ब्राह्मणाने आणलेली)
हजार नाणी घेऊन घरी परत आला. ब्राह्मणीला कुशल
सांगितले. त्याचप्रमाणे सुजात ब्राह्मण प्रव्रजित झाला व
त्याने तीन रात्रीत तीन विद्या प्राप्त केल्या. (हे सुद्धा
सांगितले). ॥३२४॥

सुंदरीची आई—

“हे सारथि! ब्राह्मणाला तीन विद्या प्राप्त झाल्या आहेत
हे ऐकून मी तुला हा अश्वरथ व हजार नाणी ह्यांची
देणगी देत आहे.” ॥३२५॥

सारथी—

“हे ब्राह्मणि! हा अश्वरथ आणि हजार नाणी तुझी तुलाच
लाभोत. मी सुद्धा श्रेष्ठ ज्ञानी भगवंताजवळ प्रव्रज्या घेईन.” ॥३२६॥

अनुक्रमणिका

सुंदरीची आई–

"हे सुन्दरि! हत्ती, घोडे, गाई व मणीरत्न तसेच समृद्ध असे हे घर सोडून तुझे वडील प्रव्रजित झाले. तू यांचा उपभोग घे. तूच कुटुंबाची एकमात्र उत्तराधिकारिणी आहेस." ॥३२७॥

सुंदरी–

"हत्ती, घोडे,गाई व हे रम्य घर सोडून माझे वडील पुत्र-शोकाने पीडित होऊन प्रव्रजित झाले. भावाच्या शोकाने पीडित झालेली मी सुद्धा प्रव्रज्या घेईन." ॥३२८॥

सुंदरीची आई–

"हे सुन्दरि! ज्याची तू इच्छा करतेस तो तुझा संकल्प पूर्ण होवो. भिक्षेकरिता दारोदारी उभी राहून मिळविलेल्या अन्नाचा गोळा व धुळीने माखलेले चीवर (वस्त्र) हे सर्व पचनी पाडून तू परलोकात अनास्त्रव (चित्तमलरहित) होशील." ॥३२९॥

सुंदरी–

"आर्ये (उपाध्याय-भिक्खुणि)! शिकत असता मी दिव्यचक्षु विशोधित केला आहे. मी पूर्वी जेथे राहिले ती पूर्वजन्मीची निवासस्थाने मी जाणते. ॥३३०॥

हे कल्याणि भिक्खुणि! तू भिक्खुणींसंघाचे भूषण अशी थेरी आहेस. तुझ्याच आश्रयाने मी तीन विद्या प्राप्त केल्या आणि बुद्धाच्या शासनाप्रमाणे आचरण केले. ॥३३१॥

हे आर्ये! माझी श्रावस्तीला जाण्याची इच्छा आहे. मला आज्ञा द्या. मी बुद्धश्रेष्ठाजवळ सिंहगर्जना करीन." ॥३३२॥

सुंदरी स्वगत–

"हे सुन्दरि! सुवर्ण वर्ण आणि पिवळी शरीर कांती असलेल्या शास्त्याला पहा. ते असंयमी लोकांना संयमी करणारे, निर्भय व सम्यक्सम्बुद्ध आहेत. ॥३३३॥

**विमुक्त, क्लेश-रहित, येथे आलेल्या मला सुन्दरीला पहा.**
**ती रागरहित, अनासक्त, कर्तव्यपूर्ण केलेली व चित्तमलरहित**
**आहे. ॥३३४॥**

सुंदरी प्रकट—

**हे महावीरा! मी वाराणसीतून येथे आले आहे. मी तुमची**
**श्राविका (शिष्या) आहे. आपल्या चरणांना वंदन करते.**
**मी सुन्दरी आहे.॥३३५॥**

**हे ब्राह्मण! मी आपली औरस (जणू काही) मुखातून**
**उत्पन्न झालेली, कृतकृत्य व चित्तमलरहित अशी मुलगी**
**आहे" ॥३३६॥**

बुद्ध—

**"हे कल्याणि! तुझे स्वागत असो. तुझे आगमन वाईट**
**नाही (कल्याणकारी आहे). शास्त्याच्या चरणांना वंदन**
**करणारे, इंद्रिय दमन केलेले (आत्मसंयमी), राग मुक्त,**
**अनासक्त (आसक्तीरहित), कृतकृत्य झालेले आणि**
**चित्तमलरहित असलेले लोक अशाच प्रकारे येतात." ॥३३७॥**

### ७०. सुभा कम्मारधीता

राजगृहातील एका सोनाराच्या घरी ही जन्मली होती. सोंदर्यसंपन्न असल्यामुळे 'सुभा' असे तिचे नाव ठेवण्यात आले होते. एके दिवशी ती भगवान तथागताचे दर्शन घेण्याकरिता गेली. वंदन करून एका बाजूला बसली. भगवंतांनी तिला धम्माचा उपदेश केला. तेथेच तिला स्रोतापत्ति फळाची प्राप्ती झाली. काही दिवसांनी गृहत्याग करून महापजापती गोतमीजवळ प्रव्रजित झाली. अर्हत्पद प्राप्तीकरिता साधना करू लागली. तिचे नातलग तिच्याकडे येऊन तिला संपत्तीचे प्रलोभन दाखवीत होते. परंतु तिने सांसारिक जीवनातील दोष दाखवून त्या सर्वांना परत पाठविले. अर्हत्पदाचा साक्षात्कार झाल्यावर ती आपल्या पूर्वजीवनाचे स्मरण करीत असतांना आनंदाने तिच्या तोंडून पुढील उद्गार बाहेर पडले :-

**मी पूर्वी तरुणी, शुद्धवसना असतांना ज्या दिवशी धम्म**
**ऐकला त्याच दिवशी अप्रमादी अशा मला सत्याचे यथार्थ**
**ज्ञान झाले. ॥३३८॥**

**त्याच दिवसापासून मला सर्व कामभोगांचे बाबतीत खूप**
**अनासक्ती वाटू लागली. सत्काय दृष्टीत (आत्मा आहे**
**असे मानण्यात) भय आहे असे पाहून मला निष्काम**

भावनेत आवड वाटू लागली. ॥३३९॥

नातलग, दास, सेवक, समृद्ध गाव आणि शेती त्याचप्रमाणे रमणीय व आनंद देणाऱ्या इतर उपभोग्य वस्तूंचा त्याग करून व मोठी संपत्ती सोडून मी प्रव्रर्जित झाले. ॥३४०॥

अशाप्रकारे श्रद्धेने संसारत्याग करून मी सद्धम्मात गेले असतांना सोने-चांदी त्यागून मी अकिञ्चन-भावाची इच्छा करावी हे योग्य नाही काय? पुनः घरी परत यावे हे श्रमणाला योग्य नाही. ॥३४१॥

चांदी अथवा सोने हे ज्ञानाकरिता नाही व शांतीकरिताही नाही. हे श्रमणाला योग्य नाही. हे आर्यांचे धन नाही. ॥३४२॥

(सोने व चांदी) लोभ, मद, मोह व रजोगुण वाढविणारे आहेत. ते जवळ बाळगण्यात अनेक शंका कुशंका व रक्षण करण्यास अनेक आयास पडतात.(असे असून सुद्धा) ते स्थिर राहत नाही (माणसाजवळ आज आहे उद्या नाही.) ॥३४३॥

येथे (सोन्या-चांदीमध्ये) आसक्त झालेली माणसे प्रमत्त होतात. त्यांच्या मनाला क्लेश उत्पन्न होतात. त्यामुळे ते एकमेकांशी सतत संघर्ष करतात व आपसात कलह वाढवितात. ॥३४४॥

कामतृष्णांमध्ये आसक्त असलेल्या मनुष्यांमध्ये वध, बंधन, परिक्लेश (यातना), हानी, शोक, उपद्रव ह्या सर्व आपत्ती दिसतात. ॥३४५॥

तर मग माझ्या नातलगांनो! तुम्ही जणु कांही माझे शत्रू होऊन कशाकरिता मला कामतृष्णांकडे वळवीत आहात ? प्रव्रजित झालेली मी कामतृष्णांत भय पाहते हे समजून घ्या ॥३४६॥

सोन्यानाण्याने आश्रव (चित्तमल) नष्ट केले जात नाहीत. काम हे मानवांचे शत्रू, वध करणारे, वैरी आहेत. त्याचप्रमाणे ते पीडादायक बंधने आहेत. ॥३४७॥

तर मग माझ्या नातलगांनो! तुम्ही जणू काही माझे शत्रू होऊन कशाकरिता मला कामतृष्णांकडे वळवीत

आहात? मुण्डन करून संघाटी (चीवर) नेसलेली अशी
मी प्रव्रजित झाले आहे हे समजून घ्या. ॥३४८॥

भिक्षेकरिता दारोदारी उभी राहून मिळविलेला अन्नाचा
गोळा व धुळीने माखलेले चीवर (वस्त्र) बेघर जीवनाचा
आधार असलेल्या मला हेच अनुकूल आहे. ॥३४९॥

दिव्य आणि मानवी कामभोग महर्षींनी नष्ट केले आहेत.
एका सुरक्षित अशा स्थानामध्ये ते विमुक्त झाले असून
त्यांनी अचल सुख प्राप्त केले आहे. ॥३५०॥

ज्यामध्ये मानवाला संरक्षण नाही अशा कामभोगांमध्ये
मी जाऊ नये. कारण कामभोग मानवांचे शत्रू, वध
करणारे, प्रज्वलित अग्निपुंजाप्रमाणे दुःखदायक आहेत. ॥३५१॥

कामभोग हा भीतीयुक्त, विघातक, काटेरी व धोक्याचा
मार्ग आहे. अत्यंत विषम असा लोभ उत्पन्न करणारा व
मोह पाडणारा आहे. ॥३५२॥

कामभोग सापाच्या फण्याप्रमाणे असून त्याचा उपसर्ग
महाभयंकर आहे. जे त्याचे अभिनदंन करतात ते मूर्ख,
अज्ञानान्ध व सामान्य आहेत. ॥३५३॥

जगामध्ये पुष्कळ अडाणी लोक कामभोगरूपी चिखलात
फसलेले आहेत. ते जन्म-मरणाच्या (चक्राचा ) अंत
जाणत नाहीत. ॥३५४॥

कामभोगाची इच्छा असल्याकारणाने पुष्कळ लोक दुर्गतीला
नेणाऱ्या मार्गाने वाटचाल करतात व ते स्वतः रोगाला
आमंत्रण देतात.॥३५५॥

अशाप्रकारे कामभोग शत्रू निर्माण करणारे, तापदायक,
क्लेशदायक, लोकांना आमिष दाखविणारे आणि माणसांना
संसाराच्या बंधनात बांधणारे आहेत. ॥३५६॥

कामभोग उन्माद व प्रलाप (व्यर्थ बडबड) उत्पन्न
करणारे, चित्त भडकविणारे असून प्राण्यांच्या क्लेशाकरिता
माराने निःशंकपणे पसरलेले जाळे आहे. ॥३५७॥

अनुक्रमणिका

कामभोग अनंत दोषयुक्त, पुष्कळ दुःखदायक, महाविषारी,
अल्प आस्वाद असलेले, युद्ध घडविणारे व (मानवजीवनाच्या)
उज्ज्वल पक्षाचे शोषण करणारे आहेत. ॥३५८॥

मी अशाप्रकारे पुन्हा आचरण करून कामभोगाच्या इच्छेने
त्या आपत्तीमध्ये पुन्हा परत येणार नाही. कारण आता
मी निब्बाणात सतत रमणारी आहे. ॥३५९॥

कामभोगाबरोबर युद्ध करून मी शांतभावाची इच्छा
करणारी आहे. सर्व बंधनांचा नाश करण्याकरिता मी
अप्रमादी राहून विहार करीन. ॥३६०॥

अशोक (शोक-रहित ), निर्मल, सुरक्षित,सरळ अशा ज्या
आर्य अष्टांगिक मार्गाने महर्षी तरुन गेले त्याच मार्गाचे
मी अनुसरण करीन. ॥३६१॥

पहा, ही धम्मात स्थिर झालेली सोनाराची कन्या, सुभा,
तृष्णारहित असलेले स्थान प्राप्त करून वृक्षाखाली ध्यान
करीत आहे. ॥३६२॥

सद्धम्माची शोभा वाढविणारी , श्रद्धायुक्त, उप्पलवण्णा
भिक्खुणीची शिष्या, तीन विद्या प्राप्त, मृत्यूवर विजय
मिळविलेली असून प्रव्रज्या घेतल्यानंतरचा तिचा आज
आठवा दिवस आहे. ॥३६३॥

ती ही भिक्खुणी इंद्रियांची भावना केलेली (आत्मसंयमी),
ऋणमुक्त, स्वतंत्र, सर्व बंधनापासून विमुक्त,
कृतकृत्य आणि चित्तमलरहित आहे. ॥३६४॥

सर्व प्राणिमात्रांचा राजा शक्र आपल्या ऋद्धिसामर्थ्याने
सर्व देवपरिवारासह येऊन त्या सोनार-कन्या सुभेला
नमस्कार करीत आहे. [गाथा क्रमांक ३६५ ही मूळची नसून बौद्ध संगीतिकारांनी म्हटलेली आहे.] ॥३६५॥

अनुक्रमणिका

# चौदावा वर्ग
# तिसावा निपात

## ७१. सुभा-जीवकम्बवनिका

राजगृहातील एका श्रीमंत ब्राह्मण कुटुंबात ही जन्मली होती. सुंदर दिसत असल्यामुळे 'सुभा' असे तिचे नाव ठेवण्यात आले. भगवंत राजगृहात आले असता त्यांचा उपदेश ऐकून धम्माप्रती खूप श्रद्धा जागृत झाली. संसारापासून विरक्त झाल्यामुळे काही दिवसांनी महापजापती गोतमीजवळ प्रव्रजित झाली. साधना करीत असता अल्पावधीत तिने अनागामी फळ प्राप्त केले. एके दिवशी सुभा दुपारच्या ध्यानभावनेसाठी जीवकाच्या आम्रवनात जात होती. वाटेत तिला एक कामपिपासू युवक भेटला. त्याने तिचा मार्ग अडवून कामोपभोगाची याचना केली. तिच्या सौंदर्यावर मोहित होऊन अनेक प्रकारची सांसारिक प्रलोभने दाखवू लागला. तेव्हा सुभा भिक्खुणीने कामतृष्णेचे दोष दाखवून स्वतः या सर्वांचा त्याग केलेली भिक्खुणी असल्याचे त्याला वारंवार सांगितले. परंतु तो युवक कामांध झाल्यामुळे या सर्वांचा त्याच्यावर काहीच परिणाम झाला नाही. सुभेने विचार केला 'हा कामांध युवक माझ्या डोळ्यावर भाळला आहे.' लगेच तिने आपला एक डोळा हाताने काढून त्या युवकाच्या हातात ठेवीत म्हटले– 'हा घे डोळा, तोच सर्व अनर्थाला कारणीभूत झाला आहे.' हे सर्व पाहून तरुण भीतीने थरथर कापू लागला. त्याची वासना या प्रकाराने कोठल्याकोठे पळून गेली. त्याने भिक्खुणीच्या पायावर आपले डोके टेकून क्षमा मागितली व तेथून ताबडतोब निघून गेला. सुभा परत भगवंताकडे आली. भगवंतांचे दर्शन झाल्यावर तिचा डोळा पूर्ववत झाला. भगवंतांनी तिला अधिक उन्नती करण्याकरिता ध्यानभावनेचा उपदेश केला. आपला पूर्वानुभव आणि त्या कामांध युवकाशी झालेला संवाद आठवून ती म्हणते :-

**जीवकाच्या सुरम्य आम्रवनाकडे जाणाऱ्या सुभा नावाच्या**
**भिक्खुणीला एका कामपिपासू (लंपट) तरुणाने अडविले**
**तेव्हा सुभा त्याला म्हणाली** [ही गाथा बौद्ध संगीतिकारांनी म्हटलेली आहे.] **:- ॥३६६॥**

**"मी तुझा काय अपराध केला आहे की ज्यामुळे तू मला**
**अडवून उभा आहेस. हे आयुष्मान! प्रव्रजित भिक्खुणीला**
**पुरुषाने स्पर्श करणे योग्य नाही. ॥३६७॥**

**भगवान सुगताने जो उपदेश केला त्या शास्त्याच्या**
**शासनाविषयी मला आदर आहे. परिशुद्ध पद प्राप्त**
**केलेल्या आणि निर्मल-चित्त असलेल्या मला अडवीत तू**
**कां उभा आहेस? ॥३६८॥**

**तू कलुषित चित्ताचा आहेस, मी निर्मल चित्ताची आहे.**
**तू रागयुक्त आहेस, मी रागरहित व शुद्ध आहे. सर्व**
**प्रकारे विमुक्त-चित्त असलेल्या मला तू कां अडवीत**
**आहेस?" ॥३६९॥**

“तू तरुणी आणि निष्पाप आहेस. तुझ्याकरिता प्रव्रज्या काय कामाची ? काषाय चीवर फेकून दे. ये, आपण या बहरलेल्या वनात रममाण होऊ. ॥३७०॥

पुष्प परागांनी समृद्ध झालेले वृक्ष सर्वत्र मधुर गंध पसरवीत आहेत. पहिल्या वसंताचा हा सुखकारक ऋतू आहे. ये, आपण फुललेल्या वनात रममाण होऊ. ॥३७१॥

शेंड्यांवर पुष्प धारण करणारे हे वृक्ष वाऱ्याने कंपित होऊन मधुर ध्वनी करीत आहेत. जर तू एकटीच वनामध्ये हिंडशील तर तुला कोणता आनंद मिळेल ? ॥३७२॥

हिंस्त्र पशूंनी भरलेल्या, मदोन्मत्त हत्ती व हत्तिणीद्वारा तुडविल्या जाणाऱ्या निर्जन, भयानक अशा विशाल वनामध्ये तु कोणी बरोबर घेतल्याशिवाय जाऊ इच्छितेस. ॥३७३॥

सोन्याच्या बाहुलीप्रमाणे अथवा चित्ररथ नावाच्या उद्यानातील अप्सरेप्रमाणे तू या वनात विचरण करीत आहेस.
हे अनुपमे! तू काशीच्या सूक्ष्म व सुंदर रेशमी वस्त्रांनी शोभून दिसत आहेस. ॥३७४॥

जर या वनामध्ये (माझ्याबरोबर) विहार करशील तर मी तुझा दास होईन. हे किन्नरि, मंद लोचने! या पृथ्वीवर तुझ्यापेक्षा जास्त प्रिय अशी मला कोणी नाही. ॥३७५॥

जर तू माझ्या वचनाप्रमाणे करशील तर ये, सुखाने घरात राहा. प्रासादात सुखाने राहात असतांना दासी तुझी सेवा करतील. ॥३७६॥

काशीचे तलम वस्त्र तू धारण कर. सुगंधित पुष्पमालांनी स्वतःला सजव (सुशोभित कर). मी तुझ्याकरिता सोने, रत्न व मोत्यांचे पुष्कळ व विविध प्रकारचे दागदागिने तयार करीन. ॥३७७॥

धुतलेली स्वच्छ चादर आच्छादलेल्या, नवीन लोकर व कापसाने विणलेल्या, चंदन लावलेल्या सुवासिक अशा मौल्यवान पलंगावर तू झोप.॥३७८॥

(अन्यथा) हे ब्रह्मचारिणि! पाण्यात उगवलेल्या, ज्याचा

कोणत्याही माणसाने उपभोग घेतला नाही, अशा कमळाप्रमाणे
तुझी शारीरिक अंगे म्हातारपणाला प्राप्त होतील." ॥३७९॥

"(मांस आदी दुर्गंधींनी भरलेल्या) प्रेतवत, स्मशानात
भर घालणाऱ्या, क्षणभंगुर अशा या शरीरात काय पाहून
तू विमुग्ध झाला आहेस?" ॥३८०॥

"पर्वतावरील किन्नरीच्या किंवा मृगीच्या (हरिणीच्या)
डोळ्याप्रमाणे तुझे (चंचल व सुंदर) डोळे आहेत. तुझे
हे डोळे पाहून माझी कामतृष्णा अधिकच वाढत आहे. ॥३८१॥

कमळाच्या पाकळ्याप्रमाणे (पापण्या) असणारे, सुवर्णाप्रमाणे
(तेजस्वी) विमल मुखमंडलावर असलेले तुझे हे
डोळे पाहून माझी कामतृष्णा अधिकच वाढत आहे.॥३८२॥

जरी तू दूर गेलीस तरी तुझ्या (डोळ्यांचे) स्मरण
करतो. तुझ्या दोन्ही पापण्यांचे केस विस्तीर्ण, विशुद्ध व
दर्शनीय आहेत. हे किन्नरि, मंदलोचने! तुझ्या डोळ्यापेक्षा
जास्त प्रिय अशी वस्तू कोणतीही नाही."॥३८३॥

"जेथे जाण्याचा मार्ग नाही तेथे तू जाण्याची इच्छा
करतोस, चंद्र खेळणे म्हणून प्राप्त करू पाहतोस. तू मेरु
ओलांडू इच्छितोस. कारण तू बुद्धकन्येच्या मागे लागला
आहेस.॥३८४॥

देवासह असलेल्या जगात (देवदेवतांच्या कल्पना असलेल्या
जगात) असे काहीही नाही की, ज्याबद्दल माझ्यात
आता अनुराग उत्पन्न होईल. अनुराग कशा प्रकारचा
असतो हे सुद्धा मी जाणत नाही. कारण (आर्य) मार्गाने
वाटचाल करून मी त्याचा समूळ नाश केला आहे.॥३८५॥

खड्ड्यातच फेकलेल्या निखाऱ्याप्रमाणे, अथवा उलटा
केलेल्या विषाच्या (निर्मूल्य) प्याल्याप्रमाणे अनुराग
कोठे गेला हे सुद्धा मी पाहत नाही. कारण (आर्य)
मार्गाने वाटचाल करून मी त्याचा समूळ नाश केला आहे. ॥३८६॥

जिने सत्याचे दर्शन केले नसेल, अथवा शास्त्याची उपासना
जिने केली नसेल तशा प्रकारच्या स्त्रीला तू प्रलोभन
दाखव. ज्ञानसंपन्न अशा माझ्याकडून तू पराजित होशील. ॥३८७॥

निंदा आणि वंदन, सुख आणि दुःख या परिस्थितीत माझी
स्मृती सतत जागृत राहते जे संस्कृत आहे ते अशुभ आहे
हे जाणून सर्वत्र (कोठेच) माझे मन आसक्त होत नाही. ॥३८८॥

ती, मी आर्य अष्टांगिक मार्गाचे अनुसरण करणारी,
भगवान सुगताची श्राविका (शिष्या) आहे. मी (तृष्णेचे)
शल्य फेकलेली, चित्तमलरहित, एकान्तस्थानी येऊन मी
(ध्यानभावनेत) रममाण होते. ॥३८९॥

काड्या आणि लाकडापासून तयार केलेली, सुचित्रित,
सुंदर, तार व खुंट्यानी बांधलेली, विविध प्रकारचे नाच
दाखविणारी सुम्भाची बाहुली मी पाहिली होती. ॥३९०॥

तार आणि खुंट्या काढून टाकल्यावर अस्ताव्यस्त होऊन
फेकली गेली. तिचे तुकडे तुकडे झाल्यावर हाती लागेल
असे काहीच शिल्लक नसते. (अशा स्थितीत त्या
बाहुलीच्या) कोणत्या (अवयवावर) मनाने लुब्ध व्हावे ? ॥३९१॥

त्याचप्रमाणे देहाचे अवयव आहेत. हे (पृथ्वी आदी चक्षु
आदी) धर्मावाचून अस्तित्वात येत नाहीत. ह्या धर्मावाचून
अस्तित्वात न येणाऱ्या कोणत्या अवयवांवर मनाने
आसक्त व्हावे ? ॥३९२॥

हरताळीच्या रंगाने भिंतीवर काढलेल्या चित्राप्रमाणे
हे शरीर पहावे. त्याबाबतीत तुझी विपरीत व मिथ्या
दृष्टी आहे. तेथे मानवी प्रज्ञा निरर्थक आहे.॥३९३॥

स्वप्नात सुवर्ण-वृक्ष पाहून आंधळ्याप्रमाणे तू त्याच्या मागे
लागला आहेस. अथवा लोकांमध्ये (जादुगाराने दाखविलेल्या)
निःसार पण रुप्याप्रमाणे भासणाऱ्या वस्तूच्या
मागे आंधळ्याप्रमाणे तू धावत आहेस. ॥३९४॥

दोन खड्ड्यात रोवलेल्या वर्तुळाप्रमाणे अश्रुपूर्ण व मध्ये
केवळ बुभुळ असलेले हे डोळे आहेत; तेथे घाण तयार होते
व विविध चक्षुपटले तयार होतात." ॥३९५॥

(असे म्हणून) त्या प्रियदर्शिनीने अत्यंत निर्विकार चित्ताने
त्याचक्षणी आपला डोळा काढून त्या मनुष्याला दिला व
म्हटले 'हा तुझा डोळा घे!' ॥३९६॥

अनुक्रमणिका

त्याचक्षणी त्या तरुणाची कामपिपासा नष्ट झाली. त्याने तिची क्षमा याचना करीत म्हटले– "हे ब्रह्मचारिणि! तुझे कल्याण होवो. अशाप्रकारे पुन्हा घडणार नाही. ॥३९७॥

तुझ्यासारख्या (वीतराग) स्त्रीशी सम्बन्ध येऊन मी प्रज्वलित अग्नीला आलिंगन देणार होतो. भयंकर विषारी सापाला धरणार होतो परंतु (आता) तुझे कल्याण होवो. मला क्षमा कर!" ॥३९८॥

त्यावेळी ती भिक्खुणी त्या (लंपटापासून) मुक्त झाली व बुद्धश्रेष्ठाच्या जवळ गेली. श्रेष्ठ पुण्यलक्षण तथागताचे दर्शन केल्यावर डोळा पूर्वीसारखाच झाला. ॥३९९॥

# पंधरावा वर्ग
# चाळीसावा निपात

## ७२. इसिदासी

उज्जैनी नगरीतील एका कुलीन व सदाचरणी व्यापाऱ्याच्या कुटुंबात इसिदासी जन्मली होती. वयात आल्यावर एका कुलीन व अनुरूप व्यापाऱ्याच्या मुलाबरोबर हिचे लग्न झाले. लग्नानंतर फक्त एक महिना सुखासमाधानाने ती पतीजवळ राहिली. अतिशय पती-परायण व गृहकार्यात दक्ष असूनसुद्धा ती पतीला आवडत नव्हती. त्यामुळे पतीने घरातून काढून दिले. त्यानंतर आईवडिलांनी तिचा दोनदा पुनर्विवाह केला. परंतु तेथे सुद्धा ती सुखी झाली नाही. शेवटी संसारापासून विरक्त झाल्यामुळे वडिलांची परवानगी घेऊन जिनदत्ता नावाच्या भिक्खुणीकडून प्रव्रज्या घेतली व संघात प्रवेश केला. परिश्रमपूर्वक साधना करीत तिने अल्पावधीत निब्बाणाच्या शांतीचा साक्षात्कार केला. एके दिवशी पाटलिपुत्र नगरीत भिक्षाटन करून जेवण झाल्यावर गंगा नदीच्या वाळूत ध्यान करण्याकरिता बसली. त्याचवेळी तिची सहचारिणी बोधि नावाची भिक्खुणी सुद्धा तेथे आली. दोघीमध्ये धार्मिक संवाद सुरू झाला. त्यावेळी इसिदासी आपले सध्याचे जीवन आणि पूर्वीचे जीवन यांचा अनुभव सांगतांना म्हणते :-

**या पृथ्वीतलावरील कुसुमपूर नामक भूषणीय पाटलिपुत्र**
**नगरीत शाक्य कुलोत्पन्न, कुलीन, गुणवान (अशा) दोन**
**भिक्खुणी होत्या. ॥४००॥**

**त्यांच्यामध्ये एक इसिदासी आणि दुसरी शीलसंपन्न**
**अशी बोधि होती. ह्या दोघीही ध्यान-अध्ययन-रत, बहुश्रुत**
**(ज्ञानी), क्लेश नष्ट केलेल्या होत्या. ॥४०१॥**

**एके दिवशी भिक्षाटन करून भोजन केल्यावर (भिक्षा-)**
**पात्र धुतल्यानंतर त्या एकान्तात सुखाने बसल्या व अशा**
**प्रकारे बोलू लागल्या– ॥४०२॥**

**‘आर्ये इसिदासि! तू प्रसन्नमुख व यौवनसंपन्न आहेस.**
**(सांसारिक जीवनात) कोणते दोष पाहून प्रव्रजित झाली**
**आहेस व निष्काम जीवन जगत आहेस ?’ ॥४०३॥**

**अशाप्रकारे विचारले असता धम्मोपदेश करण्यात कुशल**
**अशा त्या इतिदासीने एकान्त स्थानी असे म्हटले :-**
**‘कशाप्रकारे मी प्रव्रज्या घेतली ते, हे बोधि! तू ऐक’– ॥४०४॥**

**माझे वडील उज्जैनी नगरीतील एक सदाचरणी व्यापारी**
**होते. त्यांची मी एकुलती, प्रिय व अनुकंपनीय मुलगी. ॥४०५॥**

साकेत नगरीतून माझी पसंती करण्याकरिता उत्तम कुळातील लोक आले. एक श्रीमंत व्यापारी होता. माझ्या वडिलाने त्याला सून म्हणून दिले. ॥४०६॥

आपल्या घरी मिळालेल्या शिकवणुकीप्रमाणे मी रोज सकाळ-संध्याकाळ सासू-सासऱ्याला प्रणाम करीत असे. नतमस्तक होऊन त्यांच्या चरणांना वंदन करीत असे. ॥४०७॥

माझ्या पतीच्या ज्या बहिणी, भाऊ आणि परिवारातील लोक होते त्यांना नुसते एकदा पाहिले की गोंधळून आसन देत असे. ॥४०८॥

अन्न, पेय, खाद्य तसेच जे घरात असेल त्याने त्यांची सेवा करीत होते. जे ज्याला योग्य असे ते त्याला देत असे. ॥४०९॥

योग्य वेळी झोपेतून उठे. उंबरठ्यावर हातपाय धुवून घरच्या कामाला लागत असे. हात जोडून पतीकडे जात असे. ॥४१०॥

कंगवा, सुवासिक चूर्ण, काजळ, आरसा (आदी प्रसाधन साहित्य) घेऊन मी दासीप्रमाणे स्वतःच्या हाताने पतीला विभूषित करीत असे. ॥४११॥

मी स्वतः भात शिजवीत असे. स्वतः भांडी धूत असे. आई ज्याप्रमाणे आपल्या एकुलत्या एक पुत्राची सेवा करते, त्याप्रमाणे मी आपल्या पतीची सेवा करीत होते. ॥४१२॥

अशाप्रकारे पतीवर भक्ती व अनुराग असून, घरकाम करणाऱ्या, (पतीच्या) अगोदर झोपेतून उठणाऱ्या, अनाळशी, सदाचरणी, अहंकार न बाळगणाऱ्या अशा मला पती (नेहमी) दूषण देत असे. ॥४१३॥

तो आई-वडिलांना नेहमी म्हणत असे 'मी तुमची परवानगी घेऊन (घर सोडून) जाईन. मी इसिदासीबरोबर एका घरात राहू शकत नाही.' ॥४१४॥

(आई-वडील त्याला म्हणत होते—) 'हे मुला! असे बोलू नकोस. इसिदासी पंडीत, बुद्धिमान, (लवकर) झोपेतून उठणारी, अनाळशी आहे. हे मुला! ती तुला

कां आवडत नाही?’ ॥४१५॥

‘इसिदासी मला कोणताही त्रास देत नाही. तरीपण मी तिच्याबरोबर एका घरात राहू शकत नाही. तिच्याविषयी मला तिटकारा असून ती मला नको आहे. मी तुमची परवानगी घेऊन (घर सोडून) जाईन.’ ॥४१६॥

त्याचे वचन ऐकून सासू-सासऱ्याने मला विचारले– ‘तू त्याचा कोणता अपराध केला आहेस ते यथार्थपणे निःसंकोच होऊन सांग.’ ॥४१७॥

‘मी (त्याचा) कोणताही अपराध केला नाही, मी (त्यांना) त्रास देत नाही, त्यांना काहीच वाईट बोलले नाही. (असे असून सुद्धा) माझे पती माझा तिटकारा करतात. त्याबाबतीत मला काय करणे शक्य आहे?’ ॥४१८॥

(आपल्या) पुत्राला न दुखावता, त्याचे रक्षण करणाऱ्या (माझ्या) सासू-सासऱ्यांनी दुःखित व उदासीन होऊन मला माझ्या वडिलांच्या घरी नेऊन सोडले, (व म्हणाले–) ‘आम्ही आता रूपवान गृहलक्ष्मीला पारखे झालो.’ ॥४१९॥

त्यानंतर माझ्या वडिलांनी मला दुसऱ्या एका श्रीमंताच्या घरी दिले. पहिल्या व्यापाऱ्याने माझ्याकरिता जे धन दिले होते त्याच्या अर्धी संपत्ती (वडिलांनी) घेतली. ॥४२०॥

त्याच्या घरीसुद्धा मी एक महिना (सुखासमाधानाने) राहिले. (मी तेथे सुद्धा जरी) दासीप्रमाणे सेवा केली, मी निर्दोष व सदाचरणी होते (तरी एक दिवस) त्याने सुद्धा मला (घरा–) बाहेर काढले. ॥४२१॥

एके दिवशी एका जितेंद्रिय व शांतचित्त (भिक्खूला) भिक्षेकरिता फिरतांना पाहून माझे वडील त्याला म्हणाले– ‘ह्या चिंध्या आणि पात्र फेकून दे व माझा जावई हो.’ ॥४२२॥

तो सुद्धा माझ्याबरोबर पंधरा दिवस राहून वडिलांना म्हणाला, ‘मला माझ्या चिंध्या, पात्र आणि पाणी पिण्याचे भांडे द्या. मी पुनः भिक्षाटन करीन.’ ॥४२३॥

हे ऐकून माझे वडील, आई आणि माझे सर्व नातलग

त्याला म्हणाले– 'तुझे बाबतीत (तुला प्रिय) असे जे
काही केले जात नाही ते ताबडतोब केले जाईल.' ॥४२४॥

असे म्हटल्यावर तो म्हणाला– 'जर मी स्वतः आपल्या
इच्छेप्रमाणे वागू शकलो तर इसिदासीबरोबर एका घरात
राहू शकत नाही.' ॥४२५॥

अशाप्रकारे मोकळा होऊन तो निघूनसुद्धा गेला. मी एकटी
चिंता करू लागले. (मी आई-वडिलांना म्हटले–)
'तुमची परवानगी घेऊन मरायला अथवा प्रव्रज्या घ्यायला
जाते.' ॥४२६॥

तेव्हा विनय-पण्डिता, बहुश्रुता (ज्ञानी), सदाचरणी,
आर्या जिनदत्ता भिक्खुणी भिक्षा मागण्याकरिता माझ्या
वडिलांच्या घरी आली. ॥४२७॥

तिला पाहून आम्ही आसनावरून उठून तिला (आदरपूर्वक)
आसन दिले. ती बसल्यावर तिच्या चरणांना
वंदन करून मी भोजन दिले. ॥४२८॥

अन्न, पेय, खाद्यपदार्थ आदींनी आणि घरात जे उपलब्ध
होते त्याने तिला संतृप्त करून मी म्हटले– 'आर्ये! मला
प्रव्रज्या घेण्याची इच्छा आहे.' ॥४२९॥

तेव्हा वडिलांनी मला म्हटले– 'हे मुली ! तू येथे (घरात)
राहूनच धम्माचे आचरण कर. अन्न व पाणी देऊन श्रमण
व ब्राह्मणांना संतृप्त कर.'॥४३०॥

नंतर रडत रडत व दोन्ही हात जोडून मी वडिलांना
म्हटले– 'मी पापकर्म केले आहे ते नष्ट करीन.' ॥४३१॥

वडील मला म्हणाले– 'हे मुली! मनुष्यश्रेष्ठ भगवान
बुद्धाने ज्याचा साक्षात्कार केला अशा सम्बोधिचा, सर्वोच्च
धम्माचा आणि निब्बाणाचा तू लाभ घे.' ॥४३२॥

आई-वडील आणि सर्व नातलगांना अभिवादन करून मी
प्रव्रजित झाले आणि सात दिवसात तीन विद्या प्राप्त
केल्या. ॥४३३॥

अनुक्रमणिका

(माझे सर्व आयुष्य) ज्याचा फल-विपाक (परिणाम) आहे, ते सात पूर्वजन्म मी जाणते. ते तुला सांगते, एकचित्ताने ऐक– ॥४३४॥

“एरककच्छ नावाच्या नगरीत मी श्रीमंत सोनार होते. तारुण्याच्या मदाने उन्मत्त होऊन मी तेथे परस्त्रीगमन केले. ॥४३५॥

मी (त्या जन्मात) मेल्यावर दीर्घकाळ नरकामध्ये शिजत राहिले. पक्व होऊन तेथून निसटल्यावर एका वानरीच्या गर्भात उत्पन्न झाले. ॥४३६॥

जन्मल्यानंतर सात दिवसांनी वानर-समूहाच्या प्रमुख वानराने मला खच्ची केले. परस्त्रीगमन करण्याचे हे कर्मफळ मला मिळाले. ॥४३७॥

तेथून निसटून मेल्यानंतर मी सिंधु-नदीच्या अरण्यात एका आंधळ्या व लंगड्या एडकीच्या गर्भात उत्पन्न झाले. ॥४३८॥

तेथे सुद्धा मला खच्ची करण्यात आले. मी मुलांना पाठीवर बसवून बारा वर्षेपर्यंत वाहिले. मला किडे चावले, अतिशय आजारी झाले. परस्त्रीगमन करण्याचा हा दुष्परिणाम आहे. ॥४३९॥

मी तेथून निसटून गाईच्या व्यापाऱ्याच्या एका गाईच्या पोटी लाखाच्या (लाल) रंगाचे वासरू म्हणून जन्माला आले. (तेथे सुद्धा) मला बारा महिन्यानंतर खच्ची करण्यात आले. ॥४४०॥

तेथे मी नांगर आणि गाडी ओढण्याचे काम करीत होते. तेथे आंधळी आणि रोगी झाले. परस्त्रीगमन करण्याचे हे फळ आहे. ॥४४१॥

तेथे मेल्यानंतर मी बोळात राहणाऱ्या एका दासीच्या घरी जन्मले. मी स्त्री नव्हते आणि पुरुषसुद्धा नव्हते. परस्त्रीगमन करण्याचा हा परिणाम आहे. ॥४४२॥

तीस वर्षांनी मला मृत्यू आला. मेल्यानंतर एका कृपण, अतिशय दरिद्री, कर्ज-परत-फेडीची मागणी करण्याकरिता

जेथे धनकोच्या माणसांची बरीच ये जा होती अशा गाडीवानाच्या घरी (त्याची) मुलगी म्हणून जन्मले. ॥४४३॥

मुख्य तांडेलाने व्याज खूप वाढलेले आहे त्या सबबीवर मी रडत असतां, मला माझ्या घरातून ओढून बाहेर काढले. ॥४४४॥

त्यानंतर सोळाव्या वर्षी तारुण्यात पदार्पण केलेल्या मला पाहून त्या तांडेलाचा पुत्र गिरीदास याने पत्नी म्हणून ठेवून घेतले. ॥४४५॥

त्याला सुद्धा सदाचरणी (चारित्र्यसंपन्न), गुणवान, यशस्विनी, पतिव्रता अशी (दुसरी) पत्नी होती. ती आपल्या पतीशी अनुरक्त होती. (परंतु) मी तिचा द्वेष व मत्सर करू लागले. ॥४४६॥

दासीप्रमाणे ज्या ज्या पुरुषांची मी सेवा केली, त्यांनीच माझी घृणा केली व तिरस्काराने मला सोडून दिले. हे सर्व माझ्या ह्याच (पूर्व–) कर्माचे फळ आहे. परंतु आज मी त्याचाही शेवट केला आहे.' ॥४४७॥

# सोळावा वर्ग
# महानिपात

## ७३. सुमेधा

ही मंतावती नगरीचा राजा क्रौञ्च याची मुलगी. ही वयात आल्यावर आईवडिलांनी तिचे लग्न वारणवती नगरीतील अनीकरत्त नावाच्या राजाशी ठरविण्याचा बेत केला. ही लहानपणापासूनच आपल्या वयाच्या इतर राजकन्यांबरोबर भिक्खुणींकडे जाऊन धम्म ऐकत असे. दीर्घकाळापासून धम्म ऐकल्यामुळे तिला संसाराविषयी अनासक्ती वाटू लागली. लग्नाची गोष्ट जेव्हा तिला कळली तेव्हा ती आईवडिलांना म्हणाली– 'मला सांसारिक जीवन आवडत नाही, मी प्रव्रज्या घेईन.' आईवडिलांनी तिचे मन वळविण्याचा खूप प्रयत्न केला, परंतु त्याचा काहीच उपयोग झाला नाही. स्वतःच्या हाताने केस कापून ती प्रव्रजित झाली. परिश्रमपूर्वक साधना करून तिने दिव्यज्ञानाचा साक्षात्कार केला. जेव्हा तिचे नातलग तिला परावृत्त करण्याकरिता गेले तेव्हा तिने उलट त्यांनाच धम्माचा उपदेश करून बौद्ध धम्माबद्दल त्यांच्या मनात श्रद्धा उत्पन्न केली. आपल्या पूर्वजीवनाचे प्रत्यवेक्षण करीत असता ती गाते :-

**मंतावती नगरीच्या कौञ्च नावाच्या राजाच्या पट्टराणीची**
**मी मुलगी होते. बुद्ध शासनाचे पालन करणाऱ्या भिक्खूंच्याबद्दल**
**माझ्या मनात अती श्रद्धा होती. ॥४४८॥**

**मी सदाचरणी, धम्मकथांची शोकीन, बहुश्रुत, बुद्धशासनात**
**विनीत होते. (एके दिवशी) आईवडिलांकडे जाऊन**
**म्हणाले– 'तुम्ही दोघेही (माझे म्हणणे) ऐका. ॥४४९॥**

**"मी निब्बाणाकडे वळलेली आहे. दिव्य जन्म जरी असला**
**तरी तो अशाश्वत आहे. तर मग (मनुष्यलोकीचे)**
**कामभोग किती तरी तुच्छ, अल्प आस्वाद असलेले व**
**विघ्नांनी भरलेले आहेत. ॥४५०॥**

**ज्यामध्ये मूर्ख मोहित होतात ते कामभोग कटु, सर्पाप्रमाणे**
**(भयंकर) आहेत. त्यामुळे मूर्ख दीर्घकाळ नरकात पडून**
**दुःखित होतात व नाश पावतात. ॥४५१॥**

**पापकर्म करणारे, पापबुद्धी लोक नरकात पडून शोक**
**करतात व ते मूर्ख नेहमी काया, वाणी व विचाराचे**
**बाबतीत असंयत असतात. ॥४५२॥**

**मूर्ख प्रज्ञाहीन व चेतनाहीन असतात, दुःखाचे मूळ असलेल्या**
**(तृष्णेमध्ये) गुरफटलेले असतात. उपदेश केल्यावर सुद्धा**

अनुक्रमणिका

त्यांना ज्ञान होत नाही. तसेच त्यांना आर्यसत्याचा सुद्धा बोध होत नाही. ॥४५३॥

हे आई! श्रेष्ठ सम्यक् सम्बुद्धाने केलेल्या सत्याच्या उपदेशाच्या बाबतीत पुष्कळसे लोक अजाण आहेत. ते जन्म पावलेल्यांचे अभिनंदन करतात आणि देवलोकात जन्म घेण्याची अभिलाषा बाळगतात. ॥४५४॥

देवलोकातीलही उत्पत्ती अशाश्वत आहे. सर्व प्रकारचे भव अनित्य आहेत. असे असूनसुद्धा मूर्ख पुनः पुनः जन्म घेण्याचे बाबतीत संत्रस्त होत नाहीत. ॥४५५॥

चार दुर्गती आणि दोन सुगती आहेत. त्यापैकी दोन सुगती कशातरीच प्राप्त होतात. दुर्गतीला प्राप्त झालेल्यांना नरकामध्ये प्रव्रज्या नसते. ॥४५६॥

दशबल बुद्धाच्या शासनात प्रव्रज्या घेण्याची मला दोघांनीही परवानगी द्यावी. जन्ममरणाच्या नाशाकरिता (संसारकृत्यांत) न गुरफटता प्रयत्न करीन. ॥४५७॥

ह्या संसारात असार व क्षुद्र अशा शरीराचे अभिनंदन करण्यात काय अर्थ आहे ? भव तृष्णेचा नाश करण्याकरिता मी प्रव्रज्या घेईन. मला परवानगी द्या. ॥४५८॥

बुद्ध उत्पन्न झालेले आहेत. अयोग्य* क्षण* वर्ज्य केलेले आहेत. सुसंधी मिळालेली आहे. मी जीवनभर आपले शील आणि ब्रह्मचर्य भ्रष्ट करणार नाही. ॥४५९॥

जोपर्यंत गृहस्थाश्रमी तोपर्यंत आहार ग्रहण करणार नाही व मरणोन्मुखीच राहीन." अशा प्रकारे सुमेधा आई-वडिलांना वारंवार म्हणत होती. ॥४६०॥

(सुमेधाची) आई दुःखित होऊन रडू लागली आणि तिचे वडील सुद्धा सर्व प्रकारे खचले. प्रासादाच्या फरशीवर पडलेल्या मुलीला समजाविण्याकरिता (ते दोघे) म्हणू लागले– ॥४६१॥

"हे मुली ऊठ. शोक केल्याने काय फायदा? तुला वारणवतीचा सुंदर राजा अनीकरत्त याला आम्ही दिलेले

अनुक्रमणिका

आहे. ॥४६२॥

हे मुली! तू अनीकरत्त राजाची पट्टराणी होशील. शील, ब्रह्मचर्य आणि प्रव्रज्या (हे सर्व) आचरण करण्यास कठीण आहेत. ॥४६३॥

राज्यात हुकमत, धन, ऐश्वर्य यांचा सुखाने उपभोग घे. तू तरुण आहेस, कामभोगांचा उपभोग घे. हे मुली, तुझे लग्न होवो." ॥४६४॥

त्यानंतर सुमेधा म्हणाली– "अशा प्रकारच्या गोष्टी नकोत. भवसंसार असार आहे. माझी एकतर प्रव्रज्या होईल नाहीतर मरण. परंतु (अनिकरत्ताबरोबर) लग्न होणार नाही. ॥४६५॥

कीडीने घाण झालेल्या, अपवित्र, दुर्गंध बाहेर सोडणाऱ्या, भयानक, प्रेतवत, घाणीने भरलेल्या पखालीप्रमाणे, नेहमी पाझरणारे अशुद्ध पदार्थाने परिपूर्ण (असे हे शरीर आहे). ॥४६६॥

मांस व रक्ताचा लेप देऊन आच्छादित, किळसवाण्या किड्यांचे घर, पक्ष्यांचे खाद्य, असे हे शरीर प्रतिकूल आहे मी जाणते. अशा निर्जीव शरीराचे दान कशाकरिता द्यावयाचे ? ॥४६७॥

चेतनारहित देह लवकरच स्मशानात नेला जातो. घृणा करणाऱ्या नातलगांकडून (तो अचेतन देह) टाकाऊ ओंडक्याप्रमाणे स्मशानात नेला जातो : ॥४६८॥

दुसऱ्याचे खाद्य म्हणून (प्रेताला) स्मशानात सोडून घृणा करीत स्वतःचे आईवडील सुद्धा स्नान करतात, मग दुसऱ्या सामान्य जनतेची गोष्टच काय ? ॥४६९॥

अस्थी आणि स्नाविर म्हणजे शिरांनी जोडलेल्या कलेवरावर, असार, लाळ, अश्रू, मलमूत्र इत्यादी घाणीने परिपूर्ण भरलेल्या या सडलेल्या शरीरावर (मूर्ख लोक) आसक्त होतात. ॥४७०॥

या (शरीराला) फाडून आत असलेले सर्व बाहेर काढले तर (शरीरातून बाहेर पडलेल्या पदार्थांचा) दुर्गंध सहन

न झाल्याकारणाने स्वतःची आईसुद्धा घृणा करील. ॥४७१॥

स्कन्ध, धातू, आयतने, सर्व संस्कारमय गोष्टी, जन्ममूलक दुःख, ह्यांवर शहाणपणे विचार करणारी मी कशाकरिता विवाहाची इच्छा करीन? ॥४७२॥

जर माझ्या शरीरात प्रतिदिन नवनव्या तीनशे सुऱ्या खुपसल्या आणि अशाप्रकारे शंभर वर्षे पर्यंतसुद्धा आघात झाला व जर त्यामुळे (संसार) दुःखाचा क्षय झाला तर ते माझ्याकरिता श्रेयस्कर आहे. ॥४७३॥

जो शास्त्याचे वचन जाणतो तो (वरील प्रकारचे) आघात स्वीकारील पण जे लोक (जाति-जरेने) पीडित होतात त्यांचा संसार दीर्घकाळ टिकणाराच असतो. ॥४७४॥

देवलोकात, मनुष्यलोकात, पशू-योनीत, असूर-योनीत, प्रेत योनीत तसेच नरक योनीत अपरिमाण आघात दिसतात. ॥४७५॥

दुर्गतीला जाऊन नरकात पुष्कळ यातना भोगाव्या लागतात. देवलोकात सुद्धा संरक्षण नाही. निब्बाण सुखापेक्षा श्रेष्ठ दुसरे कोणतेही सुख नाही. ॥४७६॥

जे अनासक्त होऊन जन्म-मरणाच्या नाशाकरिता दशबल (भगवान बुद्धाच्या) शासनात प्रवृत्त होतात, तेच लोक निब्बाण प्राप्त करतात. ॥४७७॥

हे बाबा! मी आजच गृहत्याग करीन, असार उपभोगांचा काय उपयोग? पुनः न फुटणाऱ्या तालवृक्षाच्या बुडाप्रमाणे माझ्या कामतृष्णा ओकून टाकल्यासारख्या झाल्या आहेत व मला त्यांचा वीट आला आहे." ॥४७८॥

ती अशाप्रकारे वडिलांशी बोलत असतांना इकडे ज्याला ती दिली होती (ज्याच्याबरोबर तिचा विवाह ठरला होता), तो अनीकरत्त सुद्धा लग्नाची वेळ जवळ आल्यामुळे वारणवतीत येऊन पोहोचला. ॥४७९॥

परंतु सुमेधा आपले काळेभोर, घनदाट आणि सुकोमल केस तलवारीने कापून व आपल्या प्रासादाचे दार बंद

अनुक्रमणिका

करून प्रथम ध्यान करीत बसली. ॥४८०॥

ती ध्यानस्थ बसली असता अनीकरत्त त्या नगरीत आला. त्यावेळी सुमेधा राजप्रासादात अनित्य संज्ञेची (सर्व सांसारिक वस्तू अनित्य आहेत याची) भावना करीत होती. ॥४८१॥

ती ज्यावेळी ध्यान भावना करीत होती त्यावेळी अनीकरत्त राजाने त्वरित तिच्या (प्रासादात) प्रवेश केला व रत्ने, सोने (आदींच्या दागिन्यांनी) शरीर अलंकृत केलेल्या अनीकरत्त राजाने तिची (लग्नाकरिता) प्रार्थना केली. ॥४८२॥

"राज्यात हुकमत, धन, ऐश्वर्य, उपभोग, सुख यांचा तू तरुणी असल्यामुळे कामभोगांचा उपभोग घे. कारण कामसुख या जगात अतिशय दुर्लभ आहे. ॥४८३॥

माझे सर्व राज्य तुला अर्पित केले आहे. त्याचा तू इच्छेप्रमाणे उपभोग घे. दान दे. मन कष्टी होऊ देऊ नकोस. तुझे आई-वडील (अगोदरच) दुःखित झाले आहेत." ॥४८४॥

तेव्हा काम-तृष्णा निरर्थक वाटणारी मोहरहित झालेली सुमेधा राजाला म्हणाली– "कामतृष्णेचे अभिनंदन करू नकोस, काम-तृष्णेतील दोष पहा. ॥४८५॥

चार द्वीपांचा राजा मान्धाता हा कामभोगी माणसात श्रेष्ठ होता. परंतु तो सुद्धा अतृप्त राहूनच मरण पावला. त्याच्या (सर्व) इच्छा पूर्ण झाल्या नाहीत. ॥४८६॥

सर्व बाजूंनी दहाही दिशा भरून टाकणारी सात रत्नांची वृष्टी जरी मेघाने सभोवार केली तरीसुद्धा कामवासनांची तृप्ती होत नाही. माणसे अतृप्त राहूनच मरतात. ॥४८७॥

कामतृष्णा तलवार व भाल्याप्रमाणे आणि सापाच्या फण्याप्रमाणे (विनाशक) आहेत. प्रज्वलित उल्केप्रमाणे त्या जाळणाऱ्या आहेत आणि हाडांच्या सांगाड्याप्रमाणे (अल्प आस्वादकारक) आहेत. ॥४८८॥

कामतृष्णा अनित्य, अस्थिर, पुष्कळ दुःखदायक, महाविषारी,

संतप्त लोखंडी गोळ्याप्रमाणे, पापमूलक आणि
दुःखद फळ देणाऱ्या आहेत. ॥४८९॥

कामतृष्णा वृक्षाच्या फळाप्रमाणे (विनाश पावणाऱ्या)
मांसपेशीप्रमाणे दुःखकारक, स्वप्नाप्रमाणे फसवणूक
करणाऱ्या आणि उसनवारीप्रमाणे आहेत. ॥४९०॥

कामतृष्णा भाल्याच्या तीक्ष्ण टोकाप्रमाणे आहेत. रोग,
फोड, दुःखदायक व मरण ओढवणाऱ्या आहेत. जळत्या
निखाऱ्याच्या खड्ड्याप्रमाणे पापमूलक, भयदायक आणि
वध करणाऱ्या आहेत. ॥४९१॥

अशाप्रकारे कामतृष्णा बहुदुःखकारक व विघ्न आणणाऱ्या
अशा सांगितल्या आहेत. तुम्ही जा. मला स्वतःला आता
संसाराविषयी आस्था नाही. ॥४९२॥

स्वतःचे डोके जळत असता दुसरा माझ्याकरिता काय
करील? जरा (म्हातारपण) व मरण माझ्यामागे लागले
आहेत. त्यांच्या नाशाकरिता मी प्रयत्न केले पाहिजेत." ॥४९३॥

(खाली) जमिनीवर बसलेल्या व रडणाऱ्या आई-वडिलांना
आणि अनीकरत्त राजाला दार उघडून सुमेधाने पाहिले
व म्हटले– ॥४९४॥

"अनादी व अनंत अशा (संसारात) वडिलांच्या मरणाचे
वेळी, भावाच्या मरणाच्या वेळी व स्वतःला मारपीट
झाली असतांना पुनः पुनः रडणाऱ्या मूर्खाचा संसार दीर्घ
असतो.॥४९५॥

अश्रू, स्तन्य (आईचे दूध) व रक्ताने शिंपडला गेलेला
हा संसार अनादि व अनन्त (ज्याचा प्रारंभ व शेवट
माहीत नाही असा) आहे. याचे स्मरण करा. आवागमन
करणाऱ्या प्राण्यांचे आणि (मेलेल्या लोकांच्या) हाडांचा
साठा याचेसुद्धा स्मरण करा. ॥४९६॥

(अनादी व अनन्त अशा संसारात) एकत्र केलेले अश्रू,
स्तन्य (आईचे दूध) आणि रक्त चार समुद्राएवढे आहे
याचे स्मरण करा. एका कल्पात एकत्र केलेली मनुष्यांची
हाडे वैपुल्य पर्वताएवढी विशाल होतील याचेसुद्धा स्मरण

करा. ॥४९७॥

अनादी व अनन्त अशा संसारात आवागमन करणाऱ्या प्राण्यांच्या मातृपरंपरेचे मोजमाप करण्याकरिता संपूर्ण जम्बुद्वीपातील माती एकत्र केली व तिच्या बोराच्या आठुळ्या एवढ्या गोळ्या केल्या तरी त्या पर्याप्त होणार नाहीत. ॥४९८॥

अनादी व अनन्त अशा संसारात आवागमन करणाऱ्या प्राण्यांच्या पितृपरंपरेचे मोजमाप करण्याकरिता सर्व पृथ्वीवरील तृण, काष्ठ (लाकूड), फांद्या आणि पाने एकत्र केली व त्यांचे चार बोटाएवढे तुकडे केले तरी ते पर्याप्त होणार नाहीत याचे स्मरण करा. ॥४९९॥

मनुष्यत्व (किती दुर्लभ आहे हे) सांगणाऱ्या उपमेचे स्मरण करा—पूर्व समुद्रात पडलेले एकक्ष कासव, अन्य समुद्रात पडलेल्या (लाकडाच्या) जुवात असलेले भोक व भोकातून बाहेर काढलेले त्या कासवाचे डोके ही अत्यंत कठीण गोष्ट आहे, ह्याप्रमाणेच मनुष्यत्व-लाभ कठीण आहे. ॥५००॥

फेसाच्या गोळ्याप्रमाणे, दुर्दशाग्रस्त आणि सारहीन असलेल्या शरीराचे स्मरण करा. स्कन्ध अनित्य आहेत असे पहा. तसेच नरकातील अनेक यातनांचे स्मरण करा. ॥५०१॥

शरीर त्या त्या जन्मात मेल्यावर स्मशानात भर घालणारे आहे याचे स्मरण करा. मगराच्या भीतीचे स्मरण करा. त्याचप्रमाणे चार आर्यसत्यांचे सुद्धा स्मरण करा. ॥५०२॥

अमृत विद्यमान असतांना तुम्ही पाचही अवस्थेत [पाच अवस्था-शोध, परिग्रह, आरक्षण, परिभोग आणि विपाळ अशा पाचही अवस्थेत कडू (अट्ठकथा).] कडू असलेले पदार्थ कां पिता? सर्व विषयभोग पाच तऱ्हेने कडू असलेल्या पदार्थापेक्षाही जास्त कडू आहेत. ॥५०३॥

अमृत विद्यमान असतांना कामभोगांचा दाह कशाकरिता (सहन करता)? सर्वच कामभोग जळणारे, उकळी फुटणारे, कम्प व संताप उत्पन्न करणारे आहेत. ॥५०४॥

वैररहित (निब्बाण) असताना, पुष्कळ वैरपूर्ण अशा

कामतृष्णांशी तुम्हाला काय कर्तव्य? कामभोग राजा, अग्नी, चोर, पाणी आणि अप्रिय (दायाद) यांच्याशी समानता बाळगणारे असून पुष्कळ शत्रुत्व वाढविणारे आहेत. ॥५०५॥

विमुक्ती विद्यमान असतांना वध आणि बंधनयुक्त कामतृष्णांशी तुम्हाला काय कर्तव्य? कामभोगामुळेच वध व बंधने उत्पन्न होतात. कामासक्त माणसे दुःखाचा अनुभव घेतात. ॥५०६॥

गवताची जळती मशाल ग्रहण करणाऱ्यालाच जाळते. सोडून देणाऱ्याला जाळत नाही. कामभोग सुद्धा,मशालीप्रमाणे, ग्रहण करणाऱ्याला (आसक्त होणाऱ्याला) जाळतात. सोडून देणाऱ्याला जाळत नाहीत. ॥५०७॥

अल्प कामसुखाकरिता तुम्ही (विमुक्तीच्या) विपुलसुखाचा त्याग करू नका. (अनेक केस असलेल्या) पुथुलोम (नावाच्या) मासळीप्रमाणे हूक गिळून शेवटी नष्ट होऊन जाऊ नका. ॥५०८॥

साखळीने बांधलेल्या कुत्र्याप्रमाणे तू (ज्या कामतृष्णेने बद्ध आहेस) त्या कामतृष्णेचे दमन कर. भुकेलेले चांडाळ कुत्र्याला खातात त्याप्रमाणे कामतृष्णा तुम्हाला खातील. ॥५०९॥

कामतृष्णात आसक्त झाल्यामुळे अपरिमित दुःख आणि चित्तक्लेश अनुभवावे लागत आहेत.कामतृष्णा अध्रुव (अस्थिर) आहेत. त्यांचा त्याग करा. ॥५१०॥

जरारहित (निब्बाण) विद्यमान असतांना जरायुक्त कामभोगाशी तुझे काय कर्तव्य? सर्व जन्म सर्व प्रकारे मरण व व्याधिग्रस्त आहेत. ॥५११॥

हे (निब्बाण) अजर आहे, हे अमर आहे, हे अजरता व अमरतेचे स्थान आहे. शोकरहित, वैररहित, विघ्नरहित, निश्चल, अस्खलित, अभय आणि तापरहित आहे. ॥५१२॥

ह्या अमृताचा पुष्कळ लोकांनी आस्वाद घेतलेला आहे. आजसुद्धा ते प्राप्त केले जाणारे आहे. जो त्याच्याकरिता शहाण्याप्रमाणे प्रयत्न करील (त्याला ते प्राप्त झाल्याशिवाय

राहणार नाही) परंतु प्रयत्न न करणाऱ्याला ते
प्राप्त होणे शक्य नाही.” ॥५१३॥

सर्व संस्कारमय गोष्टीपासून विरक्त झालेल्या सुमेधाने,
आपले म्हणणे अनीकरत्तास पटवून देत असताना आपले
(कापलेले) केस जमिनीवर फेकून दिले. ॥५१४॥

अनीकरत्ताने सुद्धा उभे होऊन तिच्या वडिलांना हात जोडून
याचना केली– ‘विमुक्ती व सत्याच्या दर्शनाकरिता प्रव्रजित
होण्यासाठी सुमेधाला सोडून द्या.’ ॥५१५॥

आईवडिलांनी आज्ञा दिल्यावर (संसारातील) शोक व
भीतीने घाबरलेल्या सुमेधाने प्रव्रज्या घेतली. श्रेष्ठ फळाच्या
प्राप्तीकरिता शिकत असतांनाच तिने सहा अभिज्ञांचा
(दिव्य ज्ञानाचा) साक्षात्कार केला. ॥५१६॥

राजकन्येचे ते निब्बाण आश्चर्यपूर्ण व अद्‌भुत होते.
पूर्वजन्मातील चरित्र तिने नंतरच्या काळात याप्रकारे
सांगितले– ॥५१७॥

“ज्यावेळी भगवान कोणागमन बुद्ध संघाराम नामक नवीन
बांधलेल्या विहारात राहत होते तेव्हा आम्ही तिघी
मैत्रिणींनी (मी, खेमा आणि धनंजानी) एक विहार बांधून
भगवंतांना दान दिला. ॥५१८॥

(त्या पुण्याच्या प्रभावाने) आम्ही दहा, शंभर, हजार,
दहा हजार वेळा देवलोकात उत्पन्न झालो. मनुष्यलोकातील
उत्पत्तीबद्दल तर प्रश्नच उद्‌भवत नाही. ॥५१९॥

देवलोकात आम्ही अत्यंत ऋद्धिसंपन्न होतो. मनुष्यलोकाबद्दल
तर प्रश्नच उद्‌भवत नाही. सात रत्न धारण
करणाऱ्या (चक्रवर्ती राजाची) स्त्री-रत्न म्हणून मी
पट्टराणी होते. ॥५२०॥

(मी कोणागमनाला जे दान दिले) ते बुद्ध शासनाबद्दलच्या
आवडीचा हेतु, कारण व मूळ झाले. तेच बुद्ध शासनात
पहिले आगमन आणि नंतर धम्मात रत होऊन निब्बाण
मिळाले. ॥५२१॥

अनुक्रमणिका

त्या अनुपम प्रज्ञा असलेल्या भगवान बुद्धाच्या उपदेशावर जे श्रद्धा ठेवतात ते माझ्याप्रमाणे आचरण करतात. त्यांना संसाराबद्दल वीट येतो व वीट आल्यावर (ते) विरक्त होतात.” ॥५२२॥

अनुक्रमणिका

# टीपा

## पहिला निपात

**प्रत्यय (पच्चय)** : चीवर, पिण्डपात, शयनासन आणि ग्लानप्रत्यय भैषज्य यांना भिक्खूंचे चार प्रत्यय म्हणतात. भिक्खूंना या चार प्रत्ययांची आवश्यकता असते.

**चीवर** : भिक्खूच्या काषाय वस्त्राला चीवर म्हणतात. हे लहान लहान चौरस तुकडे जोडून तयार केले जाते. विनयाच्या नियमानुसार भिक्खूला तीन चीवरे धारण करण्याची परवानगी देण्यात आली आहे. ही तीन चीवरे खालील प्रकारची असतात.

अ. अन्तर वासक : म्हणजे आतील कापड हे लुंगीसारखे नेसले जाते. पायाच्या घोट्याच्या चार बोटे वर हे नेसावे लागते.

ब. उत्तरासंग : हे चीवर पाच हात लांब आणि चार हात रुंद असते. उपरण्याप्रमाणे शरीर झाकण्याच्या कामी याचा उपयोग होतो.

क. संघाटी : हे चीवर उत्तरासंगाएवढेच लांब आणि रुंद असते. परंतु दुहेरी शिवलेले असते. घडी घालून खांद्यावर ठेवले जाते. थंडी, वाऱ्यापासून रक्षण करण्याकरिता आणि इतर कामाकरिता त्याचा उपयोग केला जातो.

**पिण्डपात** : म्हणजे भिक्षान्न. भिक्षाटन करून प्राप्त झालेले अन्न अथवा आमंत्रण देऊन वाढलेले भोजन या दोहोंना पिण्डपात म्हणतात. भिक्खु आपले भिक्षापात्र घेऊन गृहस्थाच्या दारासमोर उभा राहतो. आपली दृष्टी खाली टाकून काहीही शब्द न उच्चारता भिक्खु शांतपणे उभा असतो. घरातील कोणतीही व्यक्ती भिक्षा आणून पात्रात टाकते व वाकून प्रणाम करते. त्यानंतर भिक्खु त्या व्यक्तीला आशीर्वाद देऊन निघून जातो. अशा प्रकारे पात्र भिक्षान्नाने पूर्ण भरल्यावर भिक्खु आपल्या विहारात परत जातो आणि दुपारचे बारा वाजण्याच्या आत जेवण करतो.

**शयनासन** : म्हणजे निवासस्थान. विहार, आवास अथवा जंगलात बांधलेली झोपडी यांना शयनासन म्हणतात.

**ग्लान प्रत्यय** : म्हणजे आजारीपणात उपयोगी पडणारे औषध. 'पूतिमुत्त भेसज्ज' म्हणजे वास मारणारे मूत्ररूपी औषध. याचाच भिक्खूंनी उपयोग करावयाचा असतो. परंतु आवश्यकता पडल्यावर कोणत्याही चिकित्सा पद्धतीचा भिक्खु उपयोग करू शकतो. दुपारचे बारा वाजल्यानंतर भिक्खु चहा, कॉफी, सरबत अथवा फळांचा रस घेऊ शकतात. त्याला ग्लानप्रत्ययच म्हटले जाते.

**प्रव्रज्या (पब्बज्ञा)** : आग्नेय आशियातील काही देशांतील बौद्ध धम्माच्या प्रचलित पद्धतीनुसार प्रत्येक उपासकाला आयुष्यात एकदा प्रव्रजित व्हावे लागते. प्रव्रजित झालेल्या व्यक्तीला श्रामणेर म्हणतात. श्रामणेर काषाय वस्त्र (चीवर) परिधान करतो. या अवस्थेत तो पालि त्रिपिटकाचे अध्ययन करतो, श्रामणेराला दहा शीलांचे पालन करावे लागते. श्रामणेराची दीक्षा तीन, पाच,

सात अथवा पंधरा दिवसांपासून ते एक दोन वर्षपर्यंतसुद्धा असते. ही दीक्षा घेतल्यानंतर श्रामणेराला भिक्खूंच्या सहवासात विहारात राहून ध्यान-भावना, चिंतन व अध्ययन करावे लागते. ही दीक्षा एखाद्या भिक्खूकडूनच घेतली जाऊ शकते. विनयपिटक नावाच्या ग्रंथात हा विधी विस्तृतपणे सांगितलेला आहे.

**उपसम्पदा** : ज्या श्रामणेरांना आजन्म भिक्खु म्हणून राहण्याची इच्छा आहे त्यांना ही दीक्षा दिली जाते. या दीक्षेकरिता श्रामणेर अथवा व्यक्ती कमीत कमी २० वर्षाची असावी लागते. एखाद्या श्रामणेराचा उपसम्पदा संस्कार झाल्यावरच त्याला भिक्खु म्हटले जाते. उपसम्पन्न भिक्खूला २२७ नियमांचे पालन करावे लागते. ही दीक्षा उत्तर प्रदेश आणि बिहारमध्ये १० भिक्खूंकडून दिली जाते आणि अन्य प्रदेशात ५ भिक्खूंकडून दिली जाते. संघाची बैठक भरल्यानंतर उपसम्पदा घेऊ इच्छिणारा श्रामणेर तेथे येतो. त्याची काही वैयक्तिक प्रश्नांच्या रूपाने परीक्षा घेतली जाते. परीक्षा उत्तीर्ण झाल्यावरच याला उपसम्पदा दिली जाते. त्यानंतर तो भिक्खु संघाचा सभासद होतो.

**पाटिहारिय पक्ख (उपोसथ)** : टीकाकारांनी तीन अर्थ दिले आहेत.

१. आषाढ महिना वर्षाकालातील तीन महिने (म्हणजे श्रावण, भाद्रपद व आश्विन) व कार्तिक असे पाच महिने.

२. आषाढ, कार्तिक व फाल्गुन हे तीन महिने.

३. बौद्धांच्या उपवासाच्या दिवसाच्या लगेच आधीचा व लगेच नंतरचा दिवस-म्हणजे त्रयोदशी व प्रतिपदा आणि सप्तमी व नवमी असे चार दिवस. प्रत्येक महिन्यातील दोन्ही अष्टमी, पौर्णिमा आणि चतुर्दशी (कृष्णपक्षातील) या दिवसांना उपोसथाचे दिवस म्हणतात. या चारही दिवशी बौद्ध लोक अष्टशील पालन करतात. दैनंदिन जीवनात बौद्ध उपासकांना पंच-शील पालन करावे लागते. परंतु उपोसथाच्या दिवशी अष्टशील पालन करावे लागते. या दिवशी लोक विहारात जातात, प्रवचन ऐकतात, ध्यान-साधना करतात आणि भिक्खूंना दान देतात.

## दुसरा निपात

**तीन विद्या (तिस्सो विज्ञा)** : तीन विद्या खालीलप्रमाणे आहेत.

अ. पुब्बेनिवासानुस्सति ञाण : पूर्वजन्म जाणण्याचे ज्ञान.

ब. चुतूपपात ञाण : जन्म व मृत्यू जाणण्याचे ज्ञान आणि

क. आसवक्खय ञाण : चित्तमलाच्या क्षयाचे ज्ञान यांनाच तीन विद्या म्हणतात. 'मज्झिमनिकाय' या ग्रंथातील बोधिराजकुमार सुत्तात या तीन विद्यांचे वर्णन केलेले आहे. चित्त परिशुद्ध, स्वच्छ, निर्मल, मृदु, कामालायक, स्थिर, अचल समाधीप्राप्त झाल्यावर भिक्खु पूर्वजन्माच्या स्मृतीच्या ज्ञानाकरिता चित्त वळवितो. नंतर तो अनेक पूर्वजन्म स्मरण करू लागतो. रात्रीच्या पहिल्या प्रहरात ही विद्या त्याला प्राप्त होते. त्याचप्रमाणे चित्त परिशुद्ध समाधी प्राप्त झाल्यावर

भिक्खु प्राण्याच्या जन्ममरणाच्या ज्ञानाकरिता चित्त वळवितो. तो दिव्यचक्षूने चांगल्या वाईट गतीला गेलेल्या प्राण्यांना पाहतो. मरणाऱ्या आणि उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांना तो पाहतो. अशाप्रकारे रात्रीच्या मधल्या प्रहरात ही दुसरी विद्या प्राप्त होते. त्याचप्रमाणे चित्त परिशुद्ध समाधी प्राप्त झाल्यावर भिक्खु चित्तमलाच्या क्षयाच्या ज्ञानाकरिता चित्त वळवितो तेव्हा त्याला चार आर्यसत्याचे व अष्टांगिक मार्गाचे ज्ञान होते त्याचप्रमाणे हे आश्रव (चित्ताचे मल) आहेत असे तो यथार्थपणे जाणतो. हा आश्रवांचा समुदय (चित्तमलाची उत्पत्ती) आहे हे यथार्थपणे जाणतो. हा आश्रवांचा निरोध (चित्तमलाचा नाश) आहे हे यथार्थपणे जाणतो आणि हा आश्रव-निरोधाचा मार्ग आहे हे यथार्थपणे जाणतो. अशा प्रकारे रात्रीच्या शेवटच्या प्रहरात ही तिसरी विद्या प्राप्त होते.

## तिसरा निपात

**स्कन्ध (खन्ध)** : स्कन्ध पाच आहेत त्यांनाच नामरूप सुद्धा म्हणतात. मनुष्य किंवा व्यक्ती ही एक शुद्ध सत्ता नाही. परंतु ती भौतिक व मानसिक अशा अनेक अवस्थांचा समुदाय (समुच्चय) आहे. म्हणजेच प्रत्येक व्यक्ती पंचस्कन्धात्मक अथवा नामरूपात्मक आहे. हे पाच स्कन्ध खालीलप्रमाणे आहेत.

अ. रूप : म्हणजे शरीराचे भौतिक भाग म्हणजेच शारीरिक अवयव; आणि नाम म्हणजे मानसिक प्रवृत्ती होत. शरीर आणि मन यांच्या परस्पर संयोगानेच मानव व्यक्तीची स्थिती (अस्तित्व) आहे. नाम चार भागात विभागले जाते.

ब. वेदना : वस्तूच्या स्पर्शाने सुख, दुःख, सौमनस्य, दौर्मनस्य अथवा उपेक्षा याप्रमाणे चित्ताच्या अवस्था त्यांना वेदना म्हटले जाते.

क. संज्ञा : ह्या सुखदुःखात्मक वेदनांच्या आधारावर आपण वस्तूंचे यथार्थ ग्रहण करतो आणि वस्तूतील गुणांच्या आधाराने आपण त्यांचे नामकरण करतो त्यालाच संज्ञा म्हणतात.

ड. संस्कार : वस्तूच्या संज्ञेशी परिचय झाल्याबरोबर तिच्याप्रती आपली इच्छा वा द्वेष यांचा उदय होतो. याप्रमाणे राग, द्वेष आदी मानसिक प्रवृत्ती म्हणजेच संस्कार होय.

इ. विज्ञान : इंद्रियजन्य स्पर्श, रस, गन्ध आदी विषयांचे ज्ञान. अशाप्रकारे बाह्य आणि आभ्यंतर असे ज्ञान म्हणजेच विज्ञान स्कन्ध होय.

**आयतन** : आयतन सहा आहेत म्हणून त्यांना षडायतन म्हणतात. डोळे, कान, नाक,जीभ, त्वचा (त्वक्) आणि मन यांना आयतने म्हणतात. ही सहा लौकिक व्यवहाराचे आधार आहेत. ही सहा आयतने आणि त्यांचे सहा विषय असे मिळून बारा होतात. पहिल्या सहाला अज्झत्तिक आयतने आणि नंतरच्या सहाला बाहिर आयतने म्हणतात.

**धातू** : चक्षु आदी सहा इंद्रिये, रूप आदी त्यांचे सहा विषय, त्याचप्रमाणे सहा इंद्रिये आणि सहा विषयांच्या संयोगाने चक्षु विज्ञान आदी सहा प्रकारचे विज्ञान या सर्वांना धातू म्हणतात.

**मार** : राग, द्वेष, मोह, मान, माया, लोभ आदी मनातील दुष्प्रवृत्तींच्या व्यक्तिरूपाला मार म्हणण्यात येते. ह्या प्रवृत्ती सत्याच्या मार्गात मानवाला बाधक असतात. सांकेतिक भाषेत याच दुष्प्रवृत्तींना मार म्हणतात.

**प्रत्येक बुद्ध (पच्चेक बुद्ध)** : निर्वाण प्राप्त केलेल्या व्यक्तीच्या तीन श्रेणी केलेल्या आहेत.

(अ) सम्यक् सम्बुद्ध, (ब) प्रत्येक बुद्ध आणि (क) अर्हत्.

अ. सम्यक् सम्बुद्ध : हे स्वप्रयत्नाने बुद्ध झालेले असतात. ते कोणी सांगितलेल्या मार्गाप्रमाणे चालत नाहीत. ते स्वतःच्या मार्गाचा आविष्कार करतात व त्या मार्गाने वाटचाल करून निब्बाण प्राप्त करून घेतात. स्वतः बुद्ध झाल्यावर इतरांच्या मुक्तीकरिता प्रयत्न करतात. व त्याकरिता आपण शोधून काढलेल्या मार्गाचा जगाच्या कल्याणाकरिता उपदेश करतात.

ब. प्रत्येक बुद्ध : ही अर्हताच्या वरची परंतु सम्यक् सम्बुद्धाच्या खालची श्रेणी आहे. हे सुद्धा स्वतःच्या प्रयत्नानेच बोधि प्राप्त करतात परंतु इतरांना उपदेश करीत नाही. फक्त स्वतःच्याच मुक्तीसाठी प्रयत्न करतात.

क. अर्हत् : सम्यक् सम्बुद्धाने आविष्कृत केलेल्या मार्गाने चालून योग्यता प्राप्त करून जीवन्मुक्त होतात. त्यांना अर्हत् म्हणतात.

**निर्वाण (निब्बाण)** : निर्वाण शब्दाचा अर्थ नाश अथवा विझणे असा होतो. तृष्णेचा नाश होणे अथवा तिच्यापासून मुक्ती मिळणे म्हणजे निर्वाण प्राप्त होणे होय. हे बौद्ध धम्माचे ध्येय आहे. बौद्ध धम्माचा संपूर्ण उपदेश निर्वाण प्राप्तीकरिता केला जातो. काम, क्रोध, मोह, मान, माया, लोभ आदी विकारांपासून सुटका झाल्यानंतर तृष्णेचा नाश होतो. तृष्णेचा नाश झाल्यावर जन्म, जरा, व्याधी, मरण यापासून सुटका होते. पर्यायाने समस्त दुःखस्कंधापासून प्राण्याची सुटका होते व त्यांना निर्वाण मिळते. ज्ञानाचा उदय झाल्याने जेव्हा अविद्येचे पाश छिन्नभिन्न होतात त्यावेळच्या अर्हत्वाच्या अवस्थेला निर्वाण म्हणतात.

**गृध्रकूट** : प्राचीन राजगृह अथवा गिरिब्रज नगर पाच पर्वतांनी वेढले होते त्यांचीं नावे अशी-पण्डव, गिज्झकूट (गृध्रकूट), वेभार, इसिगिली आणि वेपुल्ल पर्वत. या पाच पर्वतांमध्ये गृध्रकूट पर्वत अधिक महत्त्वपूर्ण आहे. या पर्वताच्या शिखराचा आकार गिधाडाच्या चोचीसारखा असल्यामुळे या पर्वताचे गृध्रकूट असे नाव पडले. या पर्वताच्या शिखरावर गिधाडे राहत असल्यामुळे या पर्वताचे गृध्रकूट नाव पडले. 'रमणीयो गिज्झकूटो पब्बतो' असे दीघनिकाय ग्रंथातील महापरिनिब्बाणसुत्तात या पर्वताचे वर्णन आहे. त्रिपिटकातील अनेक ग्रंथांत आणि अट्ठकथांमध्ये या पर्वताचे वर्णन आहे. अनेक भिक्खुंनी या पर्वतावर विहार केला होता. भगवान बुद्धाने सुद्धा

अनेकदा या पर्वतावर विहार केला होता, तसेच अनेक सुत्तांचा उपदेश केला होता. राजगृहापासून हा पर्वत २॥ मैल दूर होता.

**दोन अंगुली प्रज्ञा** : भात शिजला आहे की नाही हे पाहण्याकरिता दोन बोटांचा उपयोग करण्याइतपतचे ज्ञान म्हणून दोन अंगुली प्रज्ञा म्हटले आहे.

**सहावा निपात**

**स्त्रोतापत्ति** : याचा अर्थ प्रवाहात येणे अथवा मार्गाला लागणे असा होतो. म्हणजेच जेथून विचलित होण्याची शक्यता नसते अशा निर्वाणाच्या मार्गाला लागणे. भगवान बुद्धाच्या श्रावक संघात आठ प्रकारच्या व्यक्ती असतात असे संघाचे वर्णन केलेले आढळते. त्या पुढील प्रकारच्या असतात.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ . | स्त्रोतापत्ति मार्गाला लागलेले | | | स्त्रोतापत्ति फळ प्राप्त केलेले | | |
| ब. | सकदागामी | " | " | सकदागामी | " | " |
| क. | अनागामी | " | " | अनागामी | " | " |
| ड. | अर्हत् | " | " | अर्हत् | " | " |

निर्वाण प्राप्तीकरिता प्रयत्न करणारा भिक्खु जेव्हा सत्काय दृष्टी, विचिकिच्छा व शीलव्रतपरामर्श या तीन बंधनांना तोडतो तेव्हा तो स्त्रोतापन्न म्हटला जातो. जास्तीत जास्त सात वेळ जन्म घेऊन तो निर्वाण प्राप्त करतो.

**सकदागामी** : फक्त एक वेळ येणारा. स्त्रोतापन्न भिक्खु दीर्घोद्योग करून कामराग (इंद्रिय वासना), व्यापाद (द्वेष) ही दोन बंधने कमी करून सकदागामी पदावर आरुढ होतो. तो जर या जन्मात अर्हत् झाला नाही तर जास्तीत जास्त एक वेळ जन्म घेतो.

**अनागामी** : याचा अर्थ पुन्हा जन्म न घेणारा असा होतो. वर सांगितलेल्या दोन बंधनांचा समूळ नाश करून, भिक्खु अनागामी फळ प्राप्त करतो. त्यानंतर तो या संसारात जन्म घेणार नाही. कारण त्याच्या इंद्रिय वासना व तृष्णा नष्ट झालेल्या असतात.

**अहत्** : म्हणजे श्रेष्ठ प्रकारची योग्यता प्राप्त झालेला, जीवन्मुक्त, अर्हत् मार्गाला लागलेला. भिक्खु बाकी राहिलेली पाच बंधने रूपराग, अरूपराग, मान, औद्धत्य आणि अविद्या यांचा नाश करतो. तेव्हा तो अर्हत् पद प्राप्त करतो. या अवस्थेत त्याचे सर्व क्लेश दूर होतात व सर्व चित्तमल नष्ट होतात. जे करायचे असते ते केले जाते. अशाप्रकारे भिक्खु कृतकृत्य होतो. संपूर्ण दुःख स्कन्धाचा नाश होतो. उपादान म्हणजे संसारात जन्म घेण्याची इच्छा नष्ट झालेली असते. या अवस्थेत भिक्खूला निर्वाण प्राप्त झालेले असते. तृष्णा नष्ट झाल्यामुळे संसारापासून अलिप्त राहून तो परम शांतीचा अनुभव घेतो. शरीर सोडल्यानंतर आवागमन नेहमीकरिता बंद झालेले असते.

**बोधि अंगे** : बोधि म्हणजे सम्बोधि. सम्बोधिचा अर्थ परमज्ञान असा होतो.

**(बोधि अङ्गानि)** बोधि म्हणजेच सम्बोधिची सात अंगे आहेत ती याप्रमाणे :-

१. सति-स्मृती,

२. धम्म विचय-म्हणजे धम्म चिकित्सा,

३. विरिय-म्हणजे वीर्य, वीर्यचा अर्थ उत्साह असा होतो.

४. पीति-प्रीती अथवा आनंद,

५. पस्सद्धि-म्हणजे प्रश्रब्धि, प्रश्रब्धिचा अर्थ शमन असा होतो.

६. समाधि-म्हणजे चित्ताची एकाग्रता आणि

७. उपेक्खा-म्हणजे उपेक्षा, उपेक्षा म्हणजे आसक्ती किंवा द्वेष टाळून निःपक्षपाती असणे.

ही सात सम्बोधिची अंगे आहेत.

**बारावा निपात**

**चार घोड्यांचा रथ (चतुरस्सं रथं)** : उप्पलवण्णा थेरी अनेक ऋद्धिंनी संपन्न असल्यामुळे भगवान बुद्धाकडे जाताना तिने अनेक चमत्कार केले. त्या चमत्कारांचे वर्णन या गाथेत आहे. थेरी अपदान गाथा क्रमांक ४५४ आणि धम्मपद अट्ठकथा गाथा क्रमांक ६९ यात सुद्धा या चमत्काराचे वर्णन आहे. ऋद्धिने चक्रवर्ती राजाचे रूप धारण करून ती भगवान बुद्धाला म्हणते, 'भन्ते! मी चारही बाजूंनी बारा योजन सैन्य तयार करून आणि छत्तीस योजन लांब लवाजमा घेऊन त्याच्यासह तुम्हाला वन्दन करीत आहे.' श्रावस्तीमधील जेतवन विहारात 'इद्धिसम्पन्न थेरीमध्ये उप्पलवण्णा सर्वश्रेष्ठ आहे' अशी घोषणा भगवान बुद्धाने त्यावेळी संघामध्ये केली.

**दिव्य चक्षु धातु** : सुचरित कर्माने उत्पन्न, पित्त, कफ, रक्त आदीने विघ्नरहित आणि उपक्लेशापासून विमुक्त तसेच दूरच्या आलम्बनाला (वस्तूला) पाहण्यास समर्थ असलेल्या इंद्रियाला दिव्य चक्षु म्हणतात. असा दिव्य चक्षु प्राप्त झालेला पुरुष दिव्य, शुद्ध अलौकिक अशा या दिव्य चक्षुने उत्पन्न होणाऱ्या, मरणाऱ्या, हीन अवस्थेत आलेल्या, चांगल्या अवस्थेत आलेल्या, चांगल्या रंगाच्या, वाईट रंगाच्या, चांगल्या गतीला प्राप्त, वाईट गतीला प्राप्त, आपापल्या कर्मानुसार या अवस्थांना प्राप्त झालेल्या प्राण्यांना पाहतो. हे प्राणी शरीराचे दुराचरण, वाणीचे दुराचरण, मनाचे दुराचरण, साधु लोकांची निंदा करीत होते. मिथ्यादृष्टी धारण करीत होते, मिथ्यादृष्टीने आचरण करीत होते, त्यामुळे मेल्यावर दुर्गतीला प्राप्त झाले आहेत. हे दुसरे प्राणी शरीर, वाणी आणि मनाने सदचरण करीत होते. साधु जनांची प्रशंसा करीत होते. सम्यक् दृष्टी धारण करणारे व सम्यक् दृष्टीने आचरण करणारे होते त्यामुळे ते सुगतीला प्राप्त झाले आहेत. अशा प्रकारे तो दिव्य चक्षुने पाहतो.

**दिव्य श्रोत्र धातु** : सुचरित कर्माने उत्पन्न होत असल्यामुळे पित्त, कफ, रक्त आदी विघ्नापासून मुक्त, उपक्लेशापासून विमुक्त, दूरचे आलम्बन (आवाज) ग्रहण करण्यास समर्थ असे इंद्रिये, म्हणजे दिव्य श्रोत्र होत.

| | | |
|---|---|---|
| **सहा अभिज्ञा (छळभञ्ञा)** | : | अभिञ्ञा-शब्दाचा अर्थ विशिष्ट ज्ञान असा होतो. हे विशिष्ट ज्ञान सहा प्रकारचे असते म्हणून त्याला सहा अभिञ्ञा म्हणजेच छळभिञ्ञा म्हणतात. ते खालीलप्रमाणे असते :- |

१. इद्धिविध ञाण : पाण्यावर चालणे, आकाशात चालणे इत्यादी सिद्धी प्रदर्शित करण्याचे ज्ञान.

२. दिब्बसोत ञाण : दिव्य श्रोत्राचे ज्ञान.

३. परचित्त विजानन ञाण : दुसऱ्याचे चित्त जाणण्याचे ज्ञान.

४. पुब्बनिवासानुस्सति ञाण : पूर्वजन्मांचे स्मरण करण्याचे ज्ञान.

५. दिब्ब चक्खु ञाण : दिव्य चक्षुचे ज्ञान, आणि

६. आसवक्खय ञाण : आश्रवांचा म्हणजे चित्तमलांचा क्षय (नाश) करण्याचे ज्ञान.

हे सर्व सहा अभिज्ञा या नावाने ओळखले जातात.

## तिसावा निपात

**जीवक अम्बवन** : राजगृह नगरीतील प्रसिद्ध वैद्य जीवक याचे हे आम्रवन होते. त्याच्या नावानेच ते ओळखले जात होते. जीवकाने ते बुद्ध प्रमुख भिक्खुसंघाला अर्पण केले होते. ते त्याच्या घराजवळच होते. वेणुवन आणि गृध्रकूट पर्वत हे या वनापासून दूर होते. दीघनिकाय ग्रंथातील महापरिनिब्बाण सुत्तात भगवान बुद्धाने अनेकदा या आम्रवनात विहार केला होता अशी माहिती मिळते. अनेक सुत्तांचा उपदेश भगवान बुद्धाने जीवकम्बवनात राहत असतांना केला होता. प्रस्तुत थेरीगाथा ग्रंथात सुभा नावाची भिक्खुणी जीवकम्बवनात राहत होती त्यामुळे ती सुभा जीवकम्बवनिका या नावाने ओळखली जात होती. अशी माहिती मिळते. जीवकम्बवन राजगृह आणि गृध्रकूट पर्वताच्या मध्ये होते. प्रसिद्ध चिनी प्रवासी फा-हियान याने जीवकम्बवन पाहिले होते.

## महानिपात

**चार दुर्गती** :

अ. छन्दगतिला प्राप्त होतो,

ब. द्वेषगतिला प्राप्त होतो,

क. मोहगतिला प्राप्त होतो

आणि

ड. भयगतिला प्राप्त होतो.

हे चार दुर्गती गमन अथवा अगती गमन आहे.

**दोन सुगती** : देवयोनी आणि मनुष्य योनी या दोन सुगती आहेत.

**वैपुल्य पर्वत (वेपुल्ल पब्बत)** : वङ्क पब्बत (वंक पर्वत)-वैपुल्य पर्वताचे वंक पर्वत असे सुद्धा नाव होते. इतिवुत्तक ग्रंथातील वेपुल्ल पब्बत सुत्त यामध्ये हा पर्वत गृध्रकूट पर्वताच्या उत्तरेकडे आहे असा उल्लेख आढळतो. संयुत्तनिकाय ग्रंथामध्ये या पर्वताचे

प्राचीन नाव पाचीनवंस वङ्क पब्बत तसेच सुपस्स पब्बत असे होते, अशी माहिती मिळते. राजगृह नगर ज्या पाच पर्वतांनी वेढले होते त्यांची नावे पण्डव, गिज्झकूट, वेंभार, इसिगिलि आणि वेपुल्ल पब्बत अशी होती. ही माहिती सुत्तनिपात ग्रंथावरील अट्ठकथेत सापडते. राजगृहाजवळील पर्वतामध्ये वेपुल्ल पर्वत श्रेष्ठ आहे असे मिलिन्दपञ्ह या ग्रंथात म्हटले आहे. या पर्वतावर एक बौद्ध चैत्य होता. तेथे भगवान बुद्धाने एकदा उपदेश केला होता. काही दिगंबर जैन साधू या पर्वतावर निवास करीत आणि तपस्या करीत अशी माहिती ह्युएन-त्सांग या चिनी पंडिताने आपल्या प्रवास वर्णनात दिली आहे.

**अयोग्य क्षण** : क्षण चार प्रकारचे आहेत. हे क्षण पकडले पाहिजेत म्हणजेच त्यांचा योग्य उपयोग करून घेतला पाहिजे. नाहीतर योग्य संधी आली असता ते न पकडल्यामुळे नुकसान सोसावे लागते. त्याचा योग्य उपयोग केला नाही तर ते अयोग्य क्षण होतात.

**सात रत्ने** : दीघनिकाय ग्रंथातील अम्बट्ठ सुत्तात चक्रवर्ती राजाची सात रत्ने सांगितली आहेत. त्यांनाच विशेष चिन्हे सुद्धा म्हणतात. ती खालीलप्रमाणे आहेत :-

१. चक्र : हे चक्रवर्ती राजाचे विशेष चिन्ह होय. ते त्याच्या पुढे फिरत फिरत जाते आणि सर्व पृथ्वी काबीज करून त्या राजाला सार्वभौमत्व देते. यावरूनच त्याला चक्रवर्ती म्हटले जाते.

२. हत्ती : हा सर्वश्रेष्ठ, सात ठिकाणी दृढ, ऋद्धिमान व आकाशात उडणारा असतो. महासुदस्सन राजाच्या हत्तीचे नाव उपोसथ होते. ललितविस्तर या ग्रंथात त्यांचे नाव बोधि दिले आहे.

३. अश्व : हा सर्व श्वेत, मुंजकेशी, वृद्धिमान व आकाशात उडणारा असतो. महासुदस्सन राजाच्या अश्वाचे नाव वलाहक होते. भगवान बुद्धाने कंथक नावाच्या अश्वावर बसून महाभिनिक्खमण (गृहत्याग) केले होते.

४. मणी : हा शुभ, जोतिमान, अष्टकोनी घडविलेला, स्वच्छ, शुद्ध, सर्वाकार परिपूर्ण असा वैडूर्यमणी होय.

५. स्त्री : ही अभिरुप, दर्शनीय, प्रासादिक व परम वर्णसौंदर्याने युक्त अशी असते.

६. गृहपती : म्हणजे खजिनदार. मिलिन्दपञ्ह या ग्रंथात त्याला 'चक्कवत्तिस्स भण्डागारिक' असे म्हटले आहे.

७. परिणायक: हा राजाचा ज्येष्ठ पुत्र होय असे बुद्धघोषाचार्य म्हणतात. परंतु ललितविस्तर ग्रंथात त्याला सेनापती म्हटले आहे.

**उपासक** : ज्यांना गृहस्थाश्रम सोडून भिक्खुसंघात प्रवेश करता येत नाही, परंतु संघाच्या बाहेर राहून जे धम्म प्रसारास मदत करतात त्यांना उपासक अशी संज्ञा आहे. भगवान बुद्धांच्या सम्बोधि पासून बौद्ध उपासक अस्तित्वात आहेत. अगदी पहिले उपासक तपुस्स व भल्लिक या नावाचे दोघे व्यापारी होते. सम्बोधि

प्राप्तीनंतर चवथ्या आठवड्यात भगवंत राजायतन वृक्षाखाली बसले असता हे दोघे उत्कल जनपदातून (ओरिसा) येथे आले. तेव्हा एका देवतेने त्यांना भगवंतांस भिक्षा घालण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी केले. चार महाराजांनी आणलेल्या पात्रात भगवंतांनी ती भिक्षा घेतली. त्यांच्या विनंतीवरून भगवंतांनी त्या दोघांना उपासक म्हणून धारण केले. त्यावेळी संघ अस्तित्वात नव्हता म्हणून ते बुद्ध आणि धम्म या दोघांनाच शरण गेले. (मयं भगवन्तं सरणं गच्छाम धम्मं च), त्यामुळे त्यांना द्वेवाचिक उपासक (दोन वचनाने शरण गेलेले) म्हणतात. त्यानंतर पञ्चवग्गिय भिक्खु करून घेतल्यावर काही दिवसांनी यश नावाच्या कुलपुत्राच्या वडिलास उपासक म्हणून धारण करण्यात आले. त्यावेळी संघ अस्तित्वात आला असल्याकारणाने तो तीन वचनाने उपासक झाला. (भगवन्तं सरणं गच्छामि धम्मं च भिक्खु संघस्स च) अशाप्रकारे यश कुलपुत्राचे वडील हे तेवाचिक उपासक होत. तेव्हापासून 'सरणागमन' अथवा 'तिसरण' विधी सुरू झाला. बौद्ध उपासक होण्यास हे सरणागमन आवश्यक आहे. जेव्हा एखाद्याला उपासक व्हावेसे वाटते तेव्हा तो पुढीलप्रमाणे विनंती करतो.

'तर मी आपणास, धम्मास व भिक्खुसंघास शरण आलो आहे. शरण आलेल्या मला आजपासून मरेपर्यंत आपण उपासक म्हणून समजावे.'

पब्बज्जा अथवा उपसम्पदा विधीसारखा उपासक होण्याचा असा विधी मुळीच नाही. उपासकांचे मुख्य कर्तव्य म्हणजे भिक्खुसंघास पोसणे हे होय.



प्रा. डॉ. शेषराव कचरुजी मेश्राम यांचा जन्म ११ ऑक्टोबर १९३८ मध्ये सोनोली (ता. काटोल, जि. नागपूर, महाराष्ट्र राज्य) येथे झाला. बालवयात सहाव्या वर्षी बैलगाडीचा अपघात होऊन उजवा हात खांद्यापासून तुटला डाव्या हाताने प्राथमिक शिक्षणाला सुरुवात. शालेय शिक्षण नागपूरच्या विनायकराव देशमुख हायस्कूलमध्ये. नागपूर महाविद्यालयातून पदवीपर्यंतचे शिक्षण. बी.ए. ची पदवी पालि-प्राकृत विषयात विशेष प्राविण्यासह उत्तीर्ण. एम.ए. ची पदवी नागपूर विद्यापीठातून प्रथम श्रेणीमध्ये गुणानुक्रमे प्रथम क्रमांकाने संपादन केली. बौद्ध महाराष्ट्र : एक सांस्कृतिक अध्ययन या विषयात मराठवाडा विद्यापीठ औरंगाबादची पीएच.डी. पदवी प्राप्त केली. मिलिंद कला महाविद्यालय, औरंगाबाद येथे पालि विभाग प्रमुख म्हणून २९ वर्षांपासून कार्यरत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठातील पालि आणि बौद्ध दर्शन विभागाचे प्रभारी प्राध्यापक. पालि आणि बौद्ध दर्शन अभ्यास मंडळ, वित्त समिती, विद्वत् सभा, कला शाखा इ. समित्यांवर सदस्य म्हणून कार्य केले. १९८६ मध्ये थायलंड देशाचा अभ्यास दौरा. डॉ. बाबासाहेब आंबेडकर ग्रंथ प्रकाशन समिती, महाराष्ट्र राज्य सदस्य. आंतरराष्ट्रीय अपंग वर्षात अपंगासाठी विशेष कार्य केले. पालि व्याकरण ग्रंथाचे लेखन.

अनुक्रमणिका